श्रीवासुदेवानन्दसरस्वतीग्रंथमाला.

द्वितीयपुष्पम् (२)

# स्तोत्रादिसंग्रहः

श्री० प० प० श्रीवासुदेवानन्दसरस्वतीटेम्ब्येस्वामिविरचितः




आषाढ शुद्ध १ सोमवार ] [ दिनांक २३ जून
शके १८७४ सन १९५२

किमत ५ रुपये

श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः

# प्रकाशकाचें निवेदन



मालाकमण्डलुरधःकरपद्मयुग्मे । मध्यस्थपाणियुगले डमरुत्रिशूले ।
यस्य स्त ऊर्ध्वकरयोः शुभशंखचक्रे । ध्यायेत्तमत्रिवरदं भुजषट्कयुक्तम् १

श्रीपरमेश्वराचे कृपेनें श्रीवासुदेवानंद-ग्रंथप्रकाशन मंडळातर्फे 'स्तोत्रादि-संग्रह' हें दुसरें पुस्तक आज प्रकाशित केलें जात आहे, याबद्दल अत्यंत समाधान वाटतें. प्रथम पुस्तक 'शिक्षात्रय' हें मागील वर्षी विजयादशमीस प्रसिद्ध झालें असून, आजपर्यंत बहुतेक त्याच्या अर्ध्या अधिक प्रति जिज्ञासु संतप्रेमी सज्जनांनीं घेतल्याही आहेत. धार्मिक कार्यास विशेष अनुकूल नसणाऱ्या या कालांतही वृत्तपत्रादिरूपानें विशेष प्रसिद्धीकरण नसतांही दोन वर्षांचे आंतच या सत्कार्याची इतकी प्रगति होत आहे याला मुख्य कारण म्हणजे, श्रीमहाराजांची वैदिकधर्मनिष्ठा, अखंड तप, दृढ ईशश्रद्धा, ज्ञानविज्ञाननैपुण्य इत्यादि अतुलनीय दिव्य गुणसंपत्ति व त्यामुळें अभिव्यक्त होणारी जगदीश्वराची निस्सीम कृपा हीच आहे यांत संदेह नाहीं.

श्रीमहाराजांनीं केलेलीं अनेक देवतांचीं, तीर्थक्षेत्रांचीं संस्कृत व प्राकृत स्तोत्रें, श्रीदत्तात्रेयषोडशावतार, सत्यदत्तव्रत, अभंग, पदसमूह, नित्यभजनक्रम, अनेक देवतांच्या संस्कृत व प्राकृत आरत्या, आत्मानात्मविचार इत्यादि विविध विषय या पुस्तकांत ग्रथित केले आहेत. शक्य तितका प्रयत्न करून उपलब्ध झालेलें सर्व स्तोत्रादि वाङ्मय यांत समाविष्ट केलें आहे. स्तोत्रभागांत कांहीं स्तोत्रें समंत्रक आहेत. म्हणजे त्या स्तोत्रांतील श्लोकांचे पहिलें, तिसरें, पांचवें, नववें, बारावें अशीं अक्षरें एकाखालीं एक वाचलीं असतां निरनिराळ्या देवतांचे मंत्र तयार होतात. कांहीं अक्षरांनीं स्तोत्रकर्त्याचें नांवही तयार होतें. हें सर्व कळण्याकरितां तीं स्तोत्रें छापतांना तीं तीं अक्षरें मुद्दाम वेगळी छापलीं आहेत. छपाईच्या कांहीं अडचणीमुळें कांहीं समंत्रक स्तोत्रांचे मंत्र

अशी व्यवस्था करतां आली नाहीं. श्लोकांचा अर्थ लावण्याचे दृष्टीनें, वाटेल तेथें अक्षरें तोडून छापणें हें अयोग्य ठरेल. परंतु स्तोत्रामध्येंच मंत्ररचना करण्याचें स्तोत्रकर्त्यांचें कौशल्य नजरेसमोर यावें एवढाच तीं अक्षरें पृथक् करण्याचा उद्देश आहे. श्रीमहाराजांनीं प्रामुख्यानें श्रीदत्तसंप्रदायाचा आविष्कार केला असल्यानें इतर देवतांपेक्षां श्रीदत्तात्रेयांसंबंधीं स्तोत्रादि वाङ्मय या पुस्तकांत अधिक आलें आहे. श्रीसत्यदत्तव्रतपूजाकथा ही श्रीमहाराजांनीं केलेल्या दत्तपुराणांतील कांहीं भाग, कांहीं व्यासकृत दत्तमाहात्म्यांतील भाग व संदर्भाकरितां महाराजांनीं करून दिलेले कांहीं श्लोक असें एकत्र संकलित करून श्रीमहाराजांच्या संमतीनें शके १८२२ आश्विन महिन्यांत गरुडेश्वरीं प्रगट झाली. श्रीमहाराजांचे समक्ष हें सत्यदत्तव्रत गरुडेश्वरीं वारंवार होत असे व श्रीमहाराजांचे संप्रदायांत आजही तें चालू आहे; म्हणून, त्याचाही समावेश येथें केला आहे. सत्यदत्तपूजेंतील सर्व पुराणोक्त मंत्र तर श्रीमहाराजांच्या ' १३६ मानसपूजा ' या स्तोत्रांतीलच आहेत. सत्यदत्तव्रतासंबंधीं ही सर्व माहिती श्रीमहाराजांचे प्रेमळ भक्त बडोदा येथील पं. बाळकृष्णशास्त्री प्रकाशकर यांनीं अत्यंत आत्मीयतेनें दिल्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोंत. श्रीमहाराजांचे संप्रदायांत सुरू असलेला रोज सायंकाळचा नित्यभजनक्रमही या पुस्तकांत दिलेला आहे. नित्यभजनक्रम वेगळा छापावा, संस्कृत व प्राकृत विभागही वेगवेगळा छापावा म्हणजे छोटीं छोटीं पुस्तकें होऊन घेणाऱ्यास थोडक्या किंमतीस घेण्यास बरें पडेल इत्यादि सूचना कांहीं मंडळींनी आत्मीयपणानें केल्या होत्या. पण, श्रीमहाराजांचें संपूर्ण स्तोत्रवाङ्मय एकत्र असें सांप्रदायिकांचे घरीं राहावें अशा विशिष्ट उद्देशानें एकाच पुस्तकांत सर्वांचा समावेश केला आहे. वाणीविलास प्रेसमध्यें छापलेल्या श्रीमच्छंकराचार्यांच्या समग्र ग्रंथांप्रमाणें हे श्रीमहाराजांचे संपूर्ण ग्रंथ सांप्रदायिकांना मिळावेत हाच मुख्य उद्देश प्रकाशनाचा आहे. सध्यां असणारी कागदाची महागाई, खऱ्या प्रचाराच्या दृष्टीनें विद्वान् लोकांना व शास्त्राभ्यास करणाऱ्या योग्य अधिकारी विद्यार्थ्यांनाही शिक्षात्रयासारखे संस्कृत ग्रंथ विनामूल्य देणें इत्यादि कारणांमुळें सध्यां ठेवलेली पांच रुपये किंमत कदाचित् कोणाला असह्य वाटत असल्यास त्याबद्दल इलाज नाहीं. यामुळेंच शंभर वा पन्नास रुपये देणाऱ्या ग्राहकांना इतरांपेक्षां विशेष सवलत अशी आम्ही देऊं शकत नाहीं. मंडळाला

त्यांची ती देणगीच आहे असें समजून, फक्त टपालखर्च न घेतां प्रकाशित होणारीं पुस्तकें, प्रकाशन झाल्याबरोबर योग्य त्या सर्व ग्राहकांना पोंचविणें इतकीच सेवा मंडळाला आज करतां येणें शक्य आहे, इतकेंच या वेळीं प्रेमानें सुचविलें आहे. असो.

शिक्षात्रयाच्या निवेदनांत वर्णन केल्याप्रमाणें श्रीमहाराजांची ईश्वराद्वैत-दृष्टि कशी होती हें प्रत्यक्ष पाहाणें असल्यास हें पुस्तक अवश्य वाचावें म्हणजे खात्री होईल. " विराडादिस्थावरान्ता ईश्वरा बहवः स्मृताः । एतेषु कतमोऽन्योऽत्र मोक्षसिद्धिप्रदश्च कः ॥' विराट् पुरुषापासून अश्वत्थादि वृक्षांपर्यंत अनेक देव शास्त्रानें सांगितले आहेत. पण यांच्यांपैकीं कोणाची पूजा करावी? मोक्षाची सिद्धि करणारा कोण?—असा संशय, जिज्ञासु साधकांना सुद्धां उत्पन्न होतो मग इतरांची काय कथा? विराट् पुरुषापासून अश्वत्थ, औदुंबरादि वृक्षांपर्यंत सर्वांनाच हिंदुधर्मांत देव मानतात हा वेडेपणा आहे. आणि यामुळेंच हिंदुधर्माचा ऱ्हास होत आहे इत्यादि विचार मांडून, वैदिकधर्माभिमानी जनतेचा बुद्धिभेद करण्याचा प्रयत्न वैदिक संस्कृतीचें व्यवस्थित पूर्ण ज्ञान नसणाऱ्या पाश्चात्त्य लोकांकडून होत आहे व त्यांच्या युक्त्याभासाला भुललेले वैदिकधर्मांतर्गत कांहीं लोकही अविचारानें तेच विचार खरे समजत आहेत हें बरोबर नाहीं. 'विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् '—या सर्व जगाला माझ्या थोड्या अंशानेंच व्यापून मी उरलों आहें.—या सिद्धांताचा पूर्ण साक्षात्कार ज्यांना झाला अशा महात्म्यांच्या सहवासानें व कृपेनेंच वरील सर्व संशयांचें निरसन पूर्णपणें होऊन बुद्धि स्थिर होईल. केवळ तर्कानें या विषयाचा निर्णय कधींच लागणें शक्य नाहीं. 'दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् '—अर्जुना! तुला मी दिव्य दृष्टि देतों. त्या दृष्टीनें तूं माझें विश्वरूप पाहा. या श्लोकावरून भगवत्कृपेनें मिळालेल्या दिव्य दृष्टीनेंच ईश्वराचें यथार्थ स्वरूपदर्शन अर्जुनाला होऊं शकलें हें स्पष्ट सिद्ध होत आहे. महायोगेश्वर हरीची विविध रूपानें नटण्याची विलक्षण योगशक्ति या चर्मचक्षूंनीं कशी पाहातां येईल? दृश्यमान विविध रूपांमध्यें एकच कारण ओतप्रोत भरून राहिलें आहे. ही दिव्यदृष्टि संतांचे ठिकाणीं नित्य जागृत असते. म्हणूनच ' अस्ति ब्रह्मेति चेद्वेद सन्तमेनं ततो विदुः '—ईश्वर आहे असें जर मानेल तर

त्यालाच संत, अस्तित्ववान् असें म्हणतात.—या उपनिषद्वाक्यानें संतांचें मुख्य लक्षण हेंच सुचविलें आहे. याचेंच स्पष्टीकरण—"अस्ति तावद् ब्रह्म नित्यशुद्ध-बुद्धमुक्तस्वभावं, सर्वज्ञं, सर्वशक्तिसमन्वितम् । ब्रह्मशब्दस्य हि व्युत्पाद्यमानस्य नित्यशुद्धत्वादयोऽर्थाः प्रतीयन्ते, बृहतेर्धातोरर्थानुगमात् । "—नित्य, शुद्ध, ज्ञानरूप, मुक्त, सर्वज्ञ, सर्वशक्तिसंपन्न ब्रह्म-ईश्वर जगांत आहे. ब्रह्म शब्दाचा अर्थ पाहूं गेलें असतां हे सर्व अर्थ समोर येतात—या ग्रंथामध्यें भगवत्पूज्य-पादांनींही सूचित केलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. याप्रमाणें अभेद-भावना ज्यांच्या ठिकाणीं पूर्णपणें बाणली आहे असे संत कोणत्याही काळांत झाले असले तरी ते एकरूपच आहेत. 'साधू दिसती वेगळाले । परि ते स्वरूपीं मिळाले । अवघे मिळोनि एकचि झाल । देहातीत वस्तु ॥" या ओवींत समर्थांनीं हेंच व्यक्त केलें आहे. अशा संतांची ही समतेची खूण सर्व-साधारण जनांच्या लक्षांत एकाएकीं येत नाहीं. त्यामुळें सांप्रदायिक अभि-निवेश व तन्मूलक कलह निर्माण हाण्याचे प्रसंग उद्भवलेले दिसतात. याला कारण ईश्वरस्वरूपाची अनेकता हें नसून अशुद्धबुद्धींचें वैचित्र्य हेंच मानलें पाहिजे. हें सर्व लोकांच्या निदर्शनास आणून देण्याकरितांच श्रीमहाराजांनीं सर्वही देवतांचें स्तवन अनेकरूपांनीं केलेलें या पुस्तकांत पाहाण्यास मिळेल. श्रीकृष्णामातेची स्तुति करीत असतां श्रीमहाराज लिहितात—"प्रभावस्तेपीद्द-ग्दहति दहनो वाति पवनो, मनोल्हादे भीतस्तपति तपनो धावति मृतिः । वृषा वर्षत्यन्ये त इह बलिमुञ्झन्ति नियतं, नमः श्रीकृष्णे ते जय शमिततृष्णे गुरुमते॥"—हे श्रीकृष्णे ! हा अग्नि तुझ्या प्रभावानेंच दाह करतो.वायु वाहतो. सूर्य उग-वतो. मृत्यु आपलें काम करतो. इंद्र पाऊस पाडतो.इतरही सर्व देव तुझी पूजा करतात. हा सर्व तुझा महिमा आहे.तुला नमस्कार असो-या श्लोकांत श्रीकृष्णा वेणी ही केवल जलप्रवाहरूप मानलेली नसून सर्वांतर्यामी परमेश्वरस्वरूपच आहे ही भावना व्यक्त केली आहे.हिंदुधर्मांत अश्वत्थवृक्षाचेंही पूजन सांगितलें आहे.पण तें 'मूलतो ब्रह्मरूपाय मध्यतो विष्णुरूपिणे । अग्रतः शिवरूपाय अश्वत्थाय नमो नमः॥ '—मुळांत ब्रह्मरूप, मध्यें विष्णुस्वरूप व अग्रभागीं शिवस्वरूप अशा त्रिमूर्तिस्वरूप असणाऱ्या अश्वत्थाला नमस्कार असो.—अशी त्रिमूर्तिदृष्टि ठेवून सांगितलें आहे. हें रहस्य सत्संप्रदायावांचून कसें कळणार ? अशा विषयांत संशोधन करण्याचा अधिकार कोणाला आहे, याबद्दल सर्वतंत्रस्वतंत्र अप्पय्य

दीक्षित आपल्या सिद्धांतलेशसंग्रह या सुप्रसिद्ध वेदान्तशास्त्रीय ग्रंथाच्या शेवटीं अत्यंत कळकळीनें एका श्लोकांत सुचवीत आहेत. तो श्लोक असा— 'सिद्धान्तरीतिषु मया भ्रमदूषितेन, स्यादन्यथापि लिखितं यदि किंचिदस्य। संशोधने सहृदयाः सदया भवन्तु, **सत्संप्रदायपरिशीलननिर्विशंकाः** ॥' —शास्त्रांतील सिद्धांतमार्ग दाखवितांना मीं कदाचित् भ्रमानें विपरीतही लिहिलें असेल, तर त्याचें संशोधन करण्याची दया पंडितांनीं करावी. पण ते संशोधन करणारे मात्र उत्तम शास्त्रसंप्रदाय अभ्यासून निःशंक झालेले असावेत एवढीच माझी इच्छा आहे.—हें दीक्षितांचें सांगणें फार मार्मिकपणाचें आहे. 'कृतं कृत्यं प्रापणीयं प्राप्तमित्येव तुष्यति' अशा पूर्ण स्थितीला श्रीमहाराज पोंचलेले असूनहि, शांतिप्रद भजनमार्ग व्यक्त करण्याकरितां त्यांनीं आजीवित उपासनाही केली आहे. 'आणि मीवांचूनि कांहीं। आणीक गोमटें नाहीं। ऐसा निश्चय तिहीं। जयाचा केला ॥१॥ ...मिळोनि मिळतचि असे। समुद्रीं गंगाजळ जैसें। मी होऊनि मज तैसे। सर्वस्वें भजतो ॥२॥' इत्यादि श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें वर्णन श्रीमहाराजांचे बाबतींत यथार्थ ठरतें. पूर्ण ज्ञान झालेल्या विष्णुदास भाविकांना अहंकाराचा वाराही लागत नाहीं. कारण 'ब्रह्माद्युत्तमदेहेषु प्रविष्टो देवताऽभवत्। मर्त्याद्यधमदेहेषु स्थितो भजति देवताम् ॥१॥'—ब्रह्मदेवासारख्या उत्तम देहांत प्रवेश करून तो परमात्मा देवरूप बनला. आणि मनुष्यासारख्या सामान्य शरीरांत शिरून तोच श्रीहरी देवभक्तही बनला.— या श्लोकांत, विद्यारण्यांनीं सेव्य व सेवक हीं दोनीही रूपें परमात्म्याचींच आहेत,हा वर्णन केलेला सिद्धान्त त्यांच्या मनोभूमिकेंत दृढमूल झालेला असतो. ही श्रीमहाराजांची निरहंकारवृत्ति नक्षत्रमालिकास्तोत्रांतील 'या सप्तविंशतिश्लोकैः कृता नक्षत्रमालिका। तद्भक्तेभ्योऽर्पिता **भक्ताभिन्नश्रीदत्ततुष्टये** ॥' —सत्तावीस श्लोकांनीं केलेलें हें नक्षत्रमालिका नांवाचें स्तोत्र त्या श्रीदत्ताच्या भक्तांना मी अर्पण करतों. यानें भक्तस्वरूप श्रीदत्तांना संतोष होवो—या श्लोकावरून कळून येण्यासारखी आहे. साध्या स्तोत्रांतून महत्त्वाचे सिद्धांत ग्रथित करण्याची श्रीमहाराजांची हातोटी निरुपम आहे. संसारदुःखाचें बीज काय हें एका करुणाष्टकांतील श्लोकांत श्रीमहाराज सांगतात—'देहीं अहंता जडली न मोडवे। गृहात्मजस्त्रीममता न सोडवे। त्रितापदावानळ पोळितो मला। दत्ता कृपासाउलि दे नमो तुला ॥१॥'-अहंता आणि ममता या दोन

दोषांमुळें, देवा ! मला हा त्रितापदावाग्नीचा त्रास सोसावा लागत आहे. तुझ्या कृपेच्या सावलीनेंच तो जाईल.-किती सहृदयतेनें व सरळपणानें हें वर्णन केलेलें आहे हें सहृदय संतसेवकच जाणूं शकतील.असो. 'कां फेडीत पापताप । पोखीत तीरींचे पादप । समुद्रा जाय आप । गंगेचें जैसें ॥१॥ कां जगाचें आंध्य फेडितु । श्रियेचीं राउळें उघडितु । निघे जैसा भास्वतु । प्रदक्षिणे ॥२॥ तैसी बांधिली सोडितां । बुडाली काढितां । सांकडी फेडिता । आर्तांचिया ॥३॥ किंबहुना दिवसरातीं । पुढिलांचें सुख उन्नतीं । आणीत आणीत स्वार्थी । प्रवेशिजे ॥४॥' इत्यादि स्तुतिरूपानें संतांचें महत्कार्य श्रीज्ञानेश्वरमहाराजच जेथें स्वतः प्रगट करीत आहेत तेथे माझ्यासारख्या मितबुद्धीनें श्रीमहाराजांसारख्या महापुरुषांच्या कार्याविषयीं काय लिहावें ? ' गुणी गुणं वेत्ति न वेत्ति निर्गुणः' या न्यायानें तसे विशिष्ट गुणी सज्जन श्रीमहाराजांचें अप्रतिम गुणवैभव जाणतीलच. केवळ इतरांना मार्गदर्शन होण्याकरितां व स्वतःच्या धीशुद्धीकरितां म्हणून श्रीमहाराजांच्या गुणसमुद्रांतील कांहीं गुणबिंदु अंशतः दिग्दर्शित करण्याचा प्रयत्न वर केला आहे. त्याचें हंसक्षीरन्यायानें समालोचन करून, श्रीमहाराजांच्या ग्रंथार्थाचें परिशीलन, म्हणजेच श्रीमहाराजांची वैचारिक संगति सर्वांनीं करावी व ईशप्रसादानें अखंड शांतिसुखाचे अधिकारी व्हावें हीच सर्वांना प्रेमपूर्वक आग्रहाची विनंति आहे.

या ग्रंथाचे वेळीं श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्य करवीर मठ,यांनीं मंडळास २५ रुपये व श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्य शिष्यस्वामी वाडीकर सातारा मठ, यांनीं ५१ रुपये असें प्रसादद्रव्य देऊन आशीर्वादपूर्वक समाधानही व्यक्त केलें याबद्दल मंडळ त्यांचे ऋणी आहे. विशेष उल्लेखनीय गोष्ट म्हणजे श्रीगुरुमहाराजांच्या आदर्शसेविका श्रीमंत सौभाग्यादिगुणमंडित इंदिराबाई होळकर राणीसाहेब इंदूर, यांनीं या ग्रंथप्रकाशनकार्याकरितां १००८ एक हजार आठ रुपयांची देणगी देऊन, गुरुमहाराजांच्या कार्याविषयी असणारी आपली निस्सीम श्रद्धा अभिव्यक्त केली—ही होय. या अकल्पित प्रेमसाहाय्यानेंच हा ग्रंथ लवकर प्रकाशित करतां आला असें म्हणण्यास हरकत नाहीं. आसेतु—हिमाचल सर्वत्र विविध प्रकारचीं धर्मकार्यें अखंडित चालू राहण्याकरितां ज्या सत्त्वमूर्ति महासाध्वीनें आपल्या भांडारखान्यांतील द्रव्याचा आमरण

व्यय केला व आपल्या सात्त्विक त्यागानें मोठमोठ्या सम्राटांनाही लाजविलें, तीच अहिल्यादेवी, 'गुरू देव हे एक मानूनि भक्ति। करी नित्य जो त्या करीं येइ मुक्ति।' या श्रीमहाराजांच्या सांगण्याप्रमाणें गुरुदेवांची सेवा करण्याकरितांच राणीसाहेबांच्या रूपानें जन्माला आली असेल असें त्यांची गुरुनिष्ठा व त्यांनीं गुरुकार्याविषयीं अनेक ठिकाणीं व्यक्त केलेलें औदार्य पाहून म्हणावेसें वाटतें. असो. श्रीमंत सौ. राणीसाहेबानीं यापुढेंही अशीच प्रेमदृष्टि ठेवून, मंडळानें सुरू केलेलें हें महत्कार्य आपल्या विशुद्ध गुरुप्रेमबलानें पूर्णपणें तडीस न्यावें व मंडळाप्रमाणें सर्व गुरुभक्त जनतेसही उपकृत करावें अशी श्रीगुरुमहाराजांचे चरणांजवळ प्रार्थना आहे. स्तोत्रसंग्रह छापण्याचे वेळीं श्रीमहाराजांचे मूळ हस्तलिखित कागदपत्र अमरापूर येथील विश्वस्तांनीं देऊन जो विश्वास व आत्मीय दृष्टि व्यक्त केली त्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत आभारी आहोंत. तसेंच नागपूर येथील साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास यांचे ज्येष्ठ बंधु आहिताग्नि श्री. बाबूराव हरदास यांनीं आपल्या संग्रहांत असलेल्या श्रीदक्षिणामूर्तीच्या दोन व श्रीत्रिपुरसुंदरीची एक अशा तीन आरत्या स्तोत्रसंग्रहांत समाविष्ट करण्यास दिल्या; इंदूरचे श्रीगुरुभक्त पं. रामचंद्रशास्त्री टिल्लू यांनीं वेदांतपर भागवत, ऐतरेय अभंग इत्यादि श्रीमहाराजांचें वाङ्मय पाठविलें; बडोदा येथील पं. बाळकृष्णशास्त्री प्रकाशकर यांनीं सौभाग्यसुंदरीस्तोत्र व भैरवार्तिक्य हें नवीन वाङ्मय पाठविलें; नरसी येथील वे. शा. सं. धुंडिराजशास्त्री माहूरकर यांनीं एकादशीचें पद, नृसिंहाष्टक इत्यादि पाठविलें; बैलवाड जि. बेळगांव येथील वा. म. कुलकर्णी यांनीं आपल्या वडिलांचे संग्रहांतील मलप्रभेची आरती व शिवचिदंबरस्तोत्र दिलें. या सर्व मंडळींचे आम्ही फार आभारी आहोंत. तसेंच या कार्यास लागणारा निधि जमविण्याकरितां श्री. गोपीनाथराव चौधरी धामणगांवकर जहागीरदार हैद्राबाद, श्री. शंकरराव देशमुख आजेगांव, श्री. विष्णुपंत पंची हैद्राबाद, सौ. सरस्वतीबाई कवीश्वर नरसोबावाडी इत्यादि मंडळींचें फार साहाय्य झालें आहे व पुढेंही होणार आहे. या त्यांच्या निःस्वार्थ कर्तव्यनिष्ठेचें सत्फल श्रीगुरुमहाराजच त्यांना देण्यास समर्थ आहेत. इतकाच कर्तव्यप्राप्त उल्लेख याबद्दल आम्ही करतों. श्रीमहाराजांच्या दिव्य समागमाचें भाग्य ज्यांना लाभलें आहे असे नरसोबा-

वाडी येथील विनम्र गुरुभक्त वे. शा. सं. धुंडिराज वक्रतुंड कवीश्वर यांनीं मंडळाच्या विनंतीस मान देऊन या ग्रंथास महत्त्वद्योतक अशी विस्तृत प्रस्तावना गुरुसेवाबुद्धीनें लिहून दिली याबद्दल मंडळ त्यांचे अत्यंत ऋणी आहे. श्रीसमर्थ भारत प्रेसचे मालक श्री. सरदेसाई यांनींही वेळेवर सर्व ग्रंथ छापून दिल्याबद्दल त्यांचेही आम्ही आभारी आहोंत.

याप्रमाणें श्रीवासुदेवानंदसरस्वतीग्रंथमालेंतील हें द्वितीय पुष्प जनताजनार्दनास समर्पण केलें आहे. यापुढें अवशिष्ट ग्रंथांचें मुद्रणकार्य अद्यापि बरेंच शिल्लक आहे. तेंही सर्व गुरुभक्तांच्या प्रेमसाहाय्यानें लवकरच तडीस जावो अशी श्रीगुरुमहाराजांचे चरणाजवळ निरंतर प्रार्थना आहे.

आषाढ शु ॥ १<br>शके १८७४<br>सोमवार.

श्रीगुरुसेवक—<br>वामन दत्तात्रेय गुळवंणी.<br>नारायण पेठ २०, पुणें २.

# प्रस्तावना



**स्मृतोऽप्यवति यो विघ्नं निघ्नन्नम्बासुतः स्तुतः ।**
**गन्धर्वस्थः स हि कलौ मलौघघ्नोऽस्तु मे हृदि ॥ १ ॥**

**( गुरु वासुदेव )**

श्रीसद्गुरुवासुदेवानन्दसरस्वतीमस्करीन्द्रकर्तृकवाङ्मयमालेचें द्वितीय पुष्प 'स्तोत्रादिसंग्रह' हें मुद्रित होऊन प्रसिद्ध होत आहे. प्रथम पुष्प 'शिक्षात्रय' हें पूर्वीच प्रसिद्ध झालें आहे.इतरही लक्ष संख्येजवळ गेलेलें महाराजांचें संस्कृतप्राकृत वाङ्मय प्रसिद्ध करणेचें ग्रंथप्रकाशनमंडळानें योजिलें आहे, ही गोष्ट सर्व समाजाला समाधानकारकच आहे यांत शंका नाहीं.कारण,आर्य हिंदु समाज हा प्रायः उत्थिताकांक्षेनें, निदान उत्थाप्याकांक्षेनें का होईना, स्वोद्धारेच्छु आहे. तसा तो होतो.आणि उद्धारास निदान असलेलें कर्मशास्त्र, उपासनाशास्त्र व ज्ञान वेदान्तशास्त्र यांचें व इतरही उद्धाराचीं जीं योग, सत्संगादिक अनेक साधनें आहेत त्यांचें सर्वांचेंही संग्रथन महाराजांनीं स्वतःच्या शास्त्रात्मक वाङ्मयामध्यें अति सखोल असें केलें आहे हें ग्रंथनिरीक्षकाच्या दृष्टोत्पत्तीस येईल.त्रिकांडात्मक प्रस्थानरूप असे जे श्रीभगवद्गीतादिक दिव्य, मान्य ग्रंथ व शब्दप्रमाणरूप श्रुतिवाङ्मय वगैरे जें आहे त्या सर्वांचें प्रतिस्वरूपच असें हें महाराजांचें काव्य आहे. कोणतीही लहान मोठी अशी गुरुमहाराजांचीं कविता अशी नाहीं कीं, जी शास्त्रप्रमाणास धरून नाहीं ! यामुळें श्रद्धा-आदरयुक्त साधकांना ती सुतरां संग्राह्य अशीच झाली आहे. दुसरें–इतर जे पंडितप्रवर असे कवि असतात त्यांचें काव्य त्यांनीं मोठ्या आंतर श्रमानें, बाह्यतः डोकें खाजवून,सर्व शक्ति एकवटून निर्माण केलेलें प्रायः असतें. तसें हें महाराजांचें काव्य साधारण श्रेणींतील नसून अनन्यसाधारण, श्रीशप्रेरणेनें निर्माण झालेलें, स्वयंस्फूर्त, प्रसन्न, ईशप्रसादयुक्त, ग्राहकांना फलद्रूप होणारें, सर्वत्र प्रसिद्धीस पावून सर्वांना पटणारें असें सहज आविर्भूत असें झालें आहे.

गुरुमहाराज हे ईशावतार असल्यानेंही त्यांचें काव्य अधिकारवाणीरूप अर्थात् निखिलादरणीय, इष्टापादक असेंच आहे यांत संशय नाहीं. महाराज हे ईशदत्तावतार आहेत याचें समर्थन पंडितराज द्रविडशास्त्री यांनीं शिक्षात्रय-प्रस्तावांत कांहीं केलें आहे तें योग्यच आहे. शिवाय महाराजांचे चरित्र-पुस्तकांवरूनही तें ज्ञात होईल. तसेंच त्यांच्या श्रीदत्तात्रेयात्मतेविषयीं अनुभवही पुष्कळांना आहेत. ब्रह्मश्री, श्रीदत्तप्रिय, दैवसंपत्संपन्न श्रीआत्मारामशास्त्री जेरेकुलभूषण यांनींही जें महाराजांचें दत्तावतारत्वाबद्दल शिक्षात्रयग्रंथप्रस्तावांत सुंदर, मार्मिक, विवेचन समर्थन केलें आहे तेंही मोठें मननीय, पटणारें, ग्राह्य असेंच आहे. नृसिंहवाडींत एकदां श्रीदत्तपादुकांवर कढत पाण्याचें सेचन झालें असतां, त्या उष्णतेचे परिणाम स्फोटकादिरूपांत गुरुमहाराजांचे शरीरावर झाले. महाराज त्या वेळीं वाडींतच होते. या गोष्टीचें स्पष्टीकरण दृष्टांतरूपानें तेथील भक्तांस व महाराजांकडोनहि जनतेस कळून आलें. ‘ मी व श्रीटेंबेस्वामी हे वेगळे नसून एकच आहोंत ’ हें श्रीदत्तप्रभूंच्या, त्यावेळीं झालेल्या दृष्टांतांतील स्पष्टीकरणाचें स्वरूप आहे. पुढें उष्णोदकस्नानाची सुधारणा वाडींतील पूजक मंडळींनीं केली. महाराजांचे शरीरावरील परिणामही बरे झाले. आजही उष्णोदकस्नानाचे बाबतींत वाडींतील पूजाधिकारी मोठी दक्षता घेतात. या कथनावरून श्रीमहाराजांच्या दत्तात्रेयात्मतेविषयीं,ईशाभिन्नतेबाबत, दत्तावतार-संबंधांत शंका राहणार नाहीं. श्रीदत्तभक्त, दत्तोपासक श्रीगणेशभट व सौ.रमा-बाई या दंपतीची परमसेवा, भक्ति पाहून प्रसन्न झालेल्या श्रीदत्तमहाराजांनीं त्यांना स्वप्नांत दर्शन देऊन सांगितलें कीं ‘तुम्ही अत्रिगोत्री,माझे वडिलांचे गोत्रज आहांत. तरी तुमचे सेवेनें मी संतुष्ट होऊन, जगदुद्धारार्थ तुमचेच उदरीं जन्म घेतों. चिंता नसावी.’ असेंच, काशींतील शाब्दे परेच निष्णात परिव्राजकाचार्य सद्गुरूंनींही संन्यासेच्छु, उपसन्न गणेशभटांना काशीक्षेत्रांत सांगितलें कीं, ‘तुम्ही संन्यास घेऊं नका, परत गांवीं घरीं चला. पुढें लवकरच तुमचे उदरीं श्रीदत्त अवतार घेणार आहेत. तेच तुमचा उद्धार करतील.’ मग श्रीगणेशभट हे माणगांवीं आले. पुढें लवकरच महाराजांचा अवतार झाला. आणखीही श्री-महाराजांचे श्रीदत्तावतारत्वाबाबत पुष्कळ उदाहरणें आहेत. तीं सर्व लिहीत बसणें हें प्रकृतानुसरणाचे विरुद्ध होईल. फक्त स्थालीपुलाक न्यायानें थोडें येथें सुचविलें आहे. विशेष याबद्दल माहिती पाहिजे असेल तर ती आकर, चरित्र-

ग्रंथावरून करून घ्यावी, किंवा महाराजांचे सहवासांत असलेले वृद्ध तज्ज्ञ आज आहेत, त्यांना विचारावी. तेथून सर्व कळेल.

अध्ययन या दृष्टीनें महाराजांनीं फक्त २०-२५ च श्लोक काव्याचे म्हटले होते. पुढें अध्ययनांची सांगता, पूर्णता केली. ज्योतिषशास्त्र त्यांचें कांहीं-पूर्णच अवगत झालें होतें. पण एवढयावरून सर्वशास्त्रवेत्तृत्व, त्याची उपस्थिति, प्रमेयग्रंथनिर्मातृत्व कसें होणार? महाराजांचे सर्व ग्रंथ आज पाहिले तर ते व्याकरण, न्याय, वेदान्त, मीमांसा, साहित्य, योग, सांख्य इत्यादि सर्वांनीं परिपूरित, पंडितमान्य, प्रामाण्यबद्ध असे मोठे ओजस्वी दिसतात. एकादे पंडितानें ग्रंथ केला तरी तो एकांगीच असतो व अधीतशास्त्रापुरताच व्यापक एवढाच ग्रंथ त्याला करतां येईल. परंतु सर्व शास्त्रांचीं प्रमेयें ज्यांत ओतप्रोत, सांगोपांग ओतलीं आहेत असे ग्रंथ महाराजांवांचून इतरांचे नाहींत ही अनुभवानें अतिशयोक्ति वाटणार नाहीं. तेंही सर्व महाराजांचे ग्रंथ, अध्ययनावांचूनच उपासना इत्यादि बलानें ईशावतारत्वामुळेंच त्यांचेकडोन प्रकट झाले ही गोष्ट विसरूं नये. या महाराजांच्या चारित्र्यावरून, ' जन्मतांचि तो बालक। ॐकार जपतसे ऐक। ' या गुरुदत्तचरित्राची व सद्गुरु दत्तात्रेयांनीं मौंजीबंधनाचे वेळीं केलेल्या चारी वेदांचे पाठांची आणि उपनयनोत्तर प्रथमवर्षीच षट्शास्त्री मंडळींना शिकविल्याची, त्यांना शास्त्रपाठ दिल्याची आठवण होते. मग श्रीनृसिंहसरस्वतीदत्तात्रेय आणि श्री. प. प. वासुदेवानंदसरस्वती महाराज या उभयतांचे चरित्राची तुलना होत नाहीं असें कोण म्हणेल? योगिराज, शापानुग्रहसमर्थ, वाक्‌सिद्ध असे महाराज होते. व ' कलौ योगिराजो भविष्यति ' या भविष्यपुराणोक्तीनें, अवतारप्रकरण पाहिलें म्हणजे त्या सांगितलेल्या समयासच हा योगिराज महाराजांचा अवतार झाला हें पुराणप्रमाणानेंही सिद्ध होतें व असें प्रमाणबद्ध, पुराणवाङ्मयाधिष्ठित, महाराजांचें ईशावतारत्वप्रतिपादक प्रवचन श्रीपितृचरणांचे श्रीमहाराजांपुढेंच वाडींत झालें होतें. तें श्रोतृसमाजास पटणारें झालें. ' ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ' ' यद्यद्विभूतिमत्सत्त्वं ' याही भगवदुक्तीप्रमाणें पाहिलें तरीही महाराजांचें अवतारित्वच सिद्ध होतें. ज्ञानेश्वर-एकनाथ महाराजांनींहीं या विषयांत सुंदर विवेचन केलें आहे. असो. या थोडक्याच विवेचनानें पाहिलें असतां महाराज हे प्रत्यक्ष ईश्व-

रच होते याचा अनुभव समक्ष त्यांचे संगतींत असणाऱ्या, आज हयात अशा पुरुषांस आहे. याचा साक्षात्कार वारंवार आज त्यांना होत असतो इतकें सांगितलें म्हणजे पुरें आहे. अशा महापुरुषांची सर्वच उद्ग्रथित वाणी, ही अधिकृत, प्रमाणभूत असल्यानें ती सर्वांनाच श्रद्धेय अशी आहे. त्यांपैकींच 'स्तोत्रादिसंग्रह' हा भाग आहे.

स्तोत्र हें स्तुत्यास प्रसन्न करून घेणेचें प्रमुख निकट साधन आहे. स्तोत्र शब्दाचा अर्थ गुणवर्णन असा आहे. तें यथार्थ असें असावें. यावान् जीववर्ग, ब्रह्मादि देववर्ग सर्वही स्तुतिप्रिय असाच आहे. यांतच सर्वेषां आदिपूज्य भगवान् ईश्वर यानेंही स्वतःस गोवून घेतलें आहे म्हणजे तो स्तुतिप्रिय बनला आहे. हा निसर्ग आहे. वस्तुतः परमात्मा हा आप्तकाम, पूर्णकाम, निष्काम असा असल्यानें त्याला परकृत स्तुतिस्तोत्राची इच्छा नाहीं. गरज नाहीं. तथापि जीववर्गाच्या पूर्ण कल्याणाकरितां, त्यांच्या उद्धारासाठीं त्यानें सगुणता स्वीकारली. व त्या बरोबरच प्राण्यांच्या श्रेयाकरितां प्रभूनें स्तुतिप्रियताही अंगिकारिली आहे. स्तवनानें देवता शीघ्र प्रसन्न होते. तिच्या कृपाप्रसादानें जीवांना भुक्तिमुक्तिरूप श्रेय मिळतें. श्रीमद्भागवत एकादश स्कंध, २७वा अध्याय, यांत श्रीकृष्णांनी उद्धवाला उपासन,अर्चाक्रियायोग सांगितला, त्यांतच पुढील वाक्य आहे.–" स्तवैरुच्चावचैः स्तोत्रैः पौराणैः प्राकृतैरपि । स्तुत्वा प्रसीद भगवन्निति वन्देत दंडवत्।।" देवाच्या सगुण मूर्तीचें पूजन केल्यावर शेवटीं असें ईशस्तवन करण्याची आज्ञा आहे. " इदं स्तवमधीयानः श्रद्धाभक्तिसमन्वितः। युज्येतात्मा सुखशांतिश्रीधृतिस्मृतिकीर्तिभिः ॥" याही व्यासवाक्यांत स्तोत्रपठनानें श्रीसुखादिकांची प्राप्ति उल्लेखिली आहे. यावरून स्तोत्र, स्तुति हें कर्तव्य आहे हें सिद्ध होतें. तें वाटल्यास, अर्चन करून त्याचे शेवटीं करावें किंवा स्वतंत्र नुसतें स्तोत्र म्हटलें तरीही कल्याण आहे. केंव्हाही हें स्तोत्र म्हणतां येतें. स्तोत्ररूप वाणीमध्यें ईशगुणमहत्त्व, चरित्र, लीला, प्रार्थना इत्यादिकांचा उल्लेख असतो. स्तोत्रांतील अर्थाकडे लक्ष ठेवून, अतिप्रेमानें ईशाकारवृत्ति बनवून , अष्टांगभाव प्रगट होऊन स्तोत्रांचा पाठ होईल तर या प्रकारानें ईश्वर स्थानावरून हालतो व त्वरेनें भक्ताला जवळ घेतो. श्रीभागवतादि पुराणग्रंथ पाहिले तर स्तोत्र-स्तुतीनें स्तावकाला देव प्रसन्न तत्काल झाले व

त्यांस प्रभूनें दर्शन देऊन कृतकार्य केलें अशीं उदाहरणें परःशत आहेत. गजेंद्र, ब्रह्मदेव, इंद्रादिदेव, दक्षप्रभृतींचीं कार्यें स्तुतींनींच झालीं. व त्या सर्वांना स्तुति-प्रीत प्रभूनें संकटमुक्त केलें. दरिद्राला श्रीलक्ष्मीस्तवनानें श्रीदेवीकडून धन-संपन्न असें श्रीशंकराचार्यांनीं केलें ही कथा शांकरविजयांत आहेच. कीर्तनांत एकाग्रतेनें बसलेल्या श्रीशिवाजीमहाराजांवर तेथेंच यवनांचें भयंकर परचक्र आलें. शिवाजीस पकडणार, असें घोर संकट आलें असतां तेथें कीर्तनांत श्रीतुकाराममहाराजांनीं श्रीपांडुरंगाचें स्तवन केलें व अनन्यभावानें प्रभूस आळ-विलें. तेव्हां संकटांतून शिवाजीमहाराज कसे मुक्त झाले आणि परचक्र आलें तसें परत कसें गेलें याची साक्ष तुकारामचरित्रांत आहेच.एवंच स्तोत्र हें साधन साधकांना सामान्य असें नसून, तें फार महत्त्वाचें व भगवंतास ताब्यांत घेण्यास श्रेष्ठ अस्त्रच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.प्राकृत अशा कोणत्याही स्तोत्रानें देव प्रसन्न होतो असेंही जर आहे,तर श्रीवासुदेवानंदमहाराजांसारख्या ईश्वरानीं केलेल्या स्तोत्रपठनानें ईश्वर प्रसन्न होईल यांत नवल काय ? तरी भाविकजनांनीं श्रद्धाभक्तिपुरःसर या स्तोत्रसंग्रह पुस्तकाचा जरूर स्वकल्याणार्थ अवलंब करून त्याचें पठन करीत असावें. यानें ईशकृपाप्रसादाचा त्यांना लाभ होऊन त्यांचे सर्व मनोरथ पूर्ण होतील. प्रसिद्ध रावणभक्तानें श्रीशंकरास साम-गीतानें स्तविलें; तेव्हां [illegible] प्रसन्न होऊन रावणभक्तास दर्शन देऊन त्यास आत्मलिंग अर्पण केलें. मग जगामध्यें व देवादिकांत कशी गडबड उडाली व तेंच शंकराचें आत्मलिंग जगत्कल्याणार्थ गोकर्णमहाबळेश्वररूपानें श्रीगणेशा-कडोन कसें स्थापित, प्रगट झालें ही कथा श्रीगुरुचरित्रांत प्रसिद्ध आहेच. अशी ही स्तुति ( स्तोत्र ) सर्वत्र खळबळ उडविणारी, स्तुत्य देवादिकांसही जोरानें आकर्षण करणारी मोठी सुंदर कला आहे. द्रौपदी, प्रल्हाद असे भक्त स्तोत्रानें प्रभूस वश करते झाले.

स्तोत्र हा भक्ति-उपासनेचाच एक विभाग आहे. भक्ति ही परमप्रेमरूप अशी, नारदशांडिल्यांनीं भक्तिसूत्रांत सांगितली आहे; ती नवविधा असली तरी तिचें नवांचेही भेद पुष्कळ आहेत. त्यांत कीर्तन भक्तीचा हा स्तोत्ररूप विभाग मानावा. श्रीशाचें श्रवण,कीर्तन, स्मरणादिक असे भक्तीचे प्रकार असले तरी तें करीत असतांना ईशप्रेम-पराप्रीति हीं उत्तम प्रकट झाली पाहिजे. ती इतकी

कीं तिची व्यापकता श्रवणकीर्तनरूप क्रियेंतही होऊन श्रवणकीर्तनादिक हीं प्रेममय झालीं पाहिजेत, प्रेमरूप बनलीं पाहिजेत. व अशीं तीं बनत असतात म्हणूनच श्रवणादिकांना भक्ति-प्रेम असें नाम लाभलें आहे. व्याकरणांत भज् धातूचा अर्थ प्रीति, सेवा असा आहे. ते दोनीही अर्थ श्रवणकीर्तनांत उद्भूत व्हावेत. 'कौपीन' शब्द-अर्थानें,व्युत्पत्तीनें,एकाच वस्तूस लागू असला तरी त्या वस्तुसाहचर्यामुळें व तत्सादृश्य, तदर्थोपकारकत्व इत्यादिकांमुळेंही इतर सन्निध वस्तूंनाही 'कौपीन' ही संज्ञा शास्त्रानें लागू केली आहे. 'प्रकृति' शब्द विशिष्ट वस्तूस लागू असला तरीही, तिचें जें व्यष्टिसमष्टयात्मक कार्यजाल आहे त्या सर्वांस व कार्यजालघटक प्रतिकार्यवस्तूसही प्रकृतिकार्यत्वामुळें कां होईना प्रकृति हेंच अभिधान शास्त्रानें दिलें आहे.याचें कारण कारणगुणाचें कार्यततीमध्यें असलेलें संक्रमण हें होय. पुत्रास, आत्मा-साक्षात् जनकच असें श्रुतीनें उल्लेखिलें आहे. अशा तऱ्हेनें सान्निध्य, सादृश्य, सधर्मत्व इत्यादि कारणांमुळें एका वस्तूस अन्यवस्तुरूपता, तदात्मता मानीत असतात. याच प्रकारानें बाह्यज्ञानेंद्रियक्रियारूप जे श्रवणकीर्तनादिक आहेत त्यांना आंतर अंतःकरणक्रियारूप, वृत्तिरूप असें जें भक्तिप्रेम आहे तद्रूपता, तदात्मता ही शास्त्रानें मानली गेली म्हणजे श्रवणादिकही भक्ति या नामानेंच संबोधिलीं जातात हें योग्यच आहे. अशी ही ईशभक्ति, चतुर्विध पुरुषार्थांना, भुक्तिमुक्तीस प्राप्त करून देणारी साधना आहे. निष्काम, विरक्त पुरुषांना अपेक्षित जें ज्ञान, तेंही या भक्तीनेंच लाभतें. भक्ति ही मोक्षाला देते. मोक्ष हा केवल ज्ञानप्राप्य जरी असला तरी मोक्षप्रापक असें जें ज्ञान आहे तें भक्तीनेंच मिळतें. म्हणून परमनिश्रेयसलाभासाठीं भक्तीचा अवलंब करावा. 'भक्त्या मामभिजानाति यावान् यश्चास्मि तत्त्वतः' 'यथा ज्ञानं विना मुक्तिर्नास्त्युपायशतैरपि। तथा भक्तिं विना ज्ञानं नास्त्युपायशतैरपि॥' 'यावन्नानुग्रहः साक्षाज्जायते पारमेश्वरः। तावन्न सद्गुरुः कश्चित्सच्छास्त्रमपि नो लभेत्॥' 'भक्ति ज्ञानाची माउली' 'भक्तीपासुनि मुक्ती झाली' वगैरे वाक्यें गीता, योगवासिष्ठ, श्रीसंत तुकाराममहाराज यांचीं आहेत. यांत भक्तीनें अनुग्राहक होणारा परमेश्वर याचें अनुग्रहानेंच ज्ञानप्रद सद्गुरूची प्राप्ति, अध्यात्मशास्त्रज्ञान व ज्ञानलभ्य मुक्तीही प्राप्त होते असें म्हटलें आहे. प्रसिद्ध संत श्रीनामदेव, यांचेवर त्यांच्या परमभक्तीनें श्रीपांडुरंग प्रसन्न झाले व त्यांना सद्गुरु विसोबा खेचर यांची प्राप्ति करून दिली व तेथून खरें ब्रह्मज्ञान नामदेवांस होऊन

त्यांना ईशसायुज्य, ब्रह्मप्राप्ति–मोक्ष मिळाला हें त्यांचे चरित्रांत आहेच. भक्तीची महती, नुसतें ती ज्ञानसाधन आहे म्हणूनच नाहीं तर मुक्तपुरुष सुद्धां तिला सोडीत नाहींत म्हणूनही तिचें महत्त्व श्रेष्ठ आहे. ' आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रंथा अप्युरुक्रमे । कुर्वंत्यहैतुकीं भक्तिमित्थंभूतगुणो हरिः ॥ ' या भागवतोक्तींत हेंच वर्णन केलें आहे. नारद, शुकसनकादिक हे सर्व जीवन्मुक्त असूनही कीर्तनादि भक्तिपर कसे आहेत हें प्रसिद्ध आहे. भक्ति ही कामकल्पतरु आहे. मुक्त, मुमुक्षु, विषयी जनांनीं सेविली आहे. तिच्या अवलंबनानें सर्वांना चारीही पुरुषार्थ लाभले आहेत. म्हणून कल्याणार्थ भक्तीचा स्वीकार सर्वांनीं करावा. सगुण, मूर्त परमात्मा हा कसा भजनीय, संसेव्य, अर्चनीय आहे या विषयाचें विवेचन युवशिक्षित महाराजांनीं केलें असल्यानें, त्या बाबतींत येथें विशेष उल्लेख करण्याचें कारण नाहीं. 'सगुण पाहातां । निर्गुणांतचि गेला' हें समर्थ रामदास महाराज यांचें वाक्य, साकाराचें उपासन निर्गुण ब्रह्मप्राप्ति करून देतें हें सांगत आहे. असो. अशा तऱ्हेनें विचार करतां, प्रकृत प्रेममय स्तुति-स्तोत्रानें श्रीपरमात्म्यास आळविलें असतां, तो प्रभु शीघ्र प्रसन्न होऊन भक्तास वरप्रद होतो हें ध्यानीं येईल. असें स्तोत्रादिवाणीचें महत्त्व,अधिकारी असा स्तोत्रकार असेल तर स्तोत्रवाणीचें महत्त्व, वैशिष्ट्य, स्तोत्राची अवश्य अवलंबनीयता, विधिप्राप्त असें स्तोत्र-भक्तिकरणीयत्व, इतर साधनापेक्षा स्तोत्रसाधनाचें महत्त्व इत्यादि अवश्य विचार करण्याचे सर्वही विषय सदृष्टांत असे या लेखांत यथामति हाताळले आहेत. ज्ञानी पंडित असे पुरुष या विषयांत पूर्ण पारंगत आहेत. ते सर्वही हा विषय पूर्णपणें वैशिष्ट्यानें जाणतातच. फक्त कांहीं स्मरावें या हेतूनें हा व्यक्त लेख गृहीतविषयप्रतीकात्मक समजावा.

ईशप्रार्थना हें महत्त्वाचें साधन आहे. स्तोत्रें हीं प्रायः प्रार्थनात्मकच असतात. ती प्रार्थना स्तोत्ररूपानें ईश्वराची करणें हें शास्त्रविहित आहे. षोडशोपचाराप्रमाणें 'प्रार्थना' हेंही उपचारायित असें कर्तव्य शास्त्रानें सांगितलें आहे. प्रार्थनेवांचून पूजेची पूर्णता होत नाहीं. ती करणें म्हणजे आपले इष्टपूरणाकरितां तो प्रभूजवळ अर्ज-विनंतीच आहे. ही महत्त्वाची असल्यानें, इतर सर्व साधनांपेक्षां प्रार्थनासाधन हें महत्त्वाचें मानलें आहे. ही प्रार्थना स्तोत्रस्वरूपांत करावी. पूजेवाचून इतरही वेळीं स्तोत्रप्रार्थना केव्हांही करावी. महाराजांचें

वाङ्मय गरुडेश्वरीं श्री. प. प. ब्रह्मानंदस्वामिमहाराज यांनीं वाचलें. त्यांनीं त्या वाङ्मयाचा अभ्यास केला. फारच त्यांना समाधान-संतोष वाटला. हे ब्रह्मानंद त्यावेळीं महाराजांचे जवळ श्रीनारदेश्वरमंदिरांत ' स्वाराज्यसिद्धि ' ग्रंथ वाचीत होते. त्यावेळीं गरुडेश्वरास श्रीगुरुभक्त वामनराव गुळवणी हे गुरु-सेवेस होते, तेव्हां विद्वान्, पंडित ब्रह्मानंदांनींही असे उद्गार काढले कीं ' महाराजांचे ग्रंथ पाहिले म्हणजे, महाराज हे प्रत्यक्ष श्रीशंकराचार्य, विद्या-रण्यच आहेत असें वाटतें '–यावरूनही महाराजांचें काव्य हें कसें दिव्य, अलौकिक आहे याचें ज्ञान होईल. असो. या सर्व विवेचनावरून ' स्तोत्रादि-संग्रह ' हें पुस्तक कसें श्रद्धेय, आदरणीय, स्वीकार्य आहे हें ज्ञात होईल. या पुस्तकाच्या प्रकाशनानें ग्रंथप्रकाशनमंडळानें जनतेवर मोठे उपकार केले आहेत व स्वोद्धाराचा सुलभ मार्ग जनतेस हस्तगत करून दिला आहे याबद्दल मंडळाची स्तुति,प्रशंसा करावी तितकी थोडीच होईल. वस्तुतः मंडलघटक सर्वही पुरुष गुरुमहाराजांचे शिष्यापत्यवर्गांतील असल्यानें, ते सर्वही ग्रंथप्रसिद्धीकरण-रूपानें श्रीगुरुमहाराजांची सेवाच उत्साहानें करीत आहेत हें व्यक्त आहे. मग प्रशंसेचें कारण काय असा प्रश्न येईल; तरीही पण ' तृप्ति झालियावरी ढेकर। देती जसे जेवणार' या न्यायानें इष्टप्राप्ति झालेवर समाजाकडून मंडळास धन्यो-द्गार, प्रशंसोद्गार हे मिळणारच. असो. मंडळाकडून हा स्तुत्य उपक्रम चालू आहे. कामकल्पतरु भगवान् स्मर्तृगामी श्रीदत्तप्रभु, मंडळाचे व तसेच अपेक्षित असलेले भाविकजनतेचे मनोरथ पूर्ण करो ही त्या अंतर्यामी ईशाजवळ प्रार्थना आहे.

आतां जातां जातां ' स्तोत्रादिसंग्रह ' पुस्तकांत कोणत्या देवतेचीं स्तोत्रें संस्कृत व इतर प्राकृत अभंग पद्यादिक आहेत व या काव्यांत वैशिष्ट्य कोणतें ? हें थोडें सूचित करून हा लेख संपविणेचा आहे. गणपतिस्तोत्रें,तसेंच सरस्वती आणि इतर सर्व देवांचीं स्तोत्रें, पंचायतनदेवतामहत्त्ववर्णन, शंकर, विष्णु, गंगादि विविधनदीतीर्थक्षेत्रस्तोत्रें, श्रीवेंकटेशमल्लारिस्तोत्रें, श्रीदत्तात्रेयस्तोत्रें, वेदांतपर स्तोत्रें वगैरे वगैरे हे भाग संस्कृत आहेत.आणि प्राकृत विभाग-अभंग, पदसमूह, वेदांतपर प्राकृत भाग, नित्यभजनपंचपदीक्रम, आरतीसंग्रह वगैरे पुष्कळ विभाग प्राकृतामध्यें येणार आहेत. असें सर्व संस्कृतप्राकृतमिळून बरेंच मोठें पुस्तक स्त्रियांना, पुरुषांना, आणि संस्कृतप्राकृत जाणणारे यांना सर्वां-

नाच संग्रह करणेस योग्य असें हें ' स्तोत्रादिसंग्रह ' पुस्तक होत आहे. यांत विशेष हा आहे कीं, गणपति , अन्नपूर्णा, शिव वगैरे देवतास्तोत्रांत प्रत्येक अर्धश्लोकांची पहिलीं, पांचवीं, नऊ वा बारावीं अशीं अक्षरें एकाखालीं एक अशीं वाचलीं म्हणजे ग्रन्थकर्तृनाम, गणेशगायत्री, शिव, दत्त यांचे गायत्रीमंत्र, गणेशवेदमंत्र, अन्नपूर्णामंत्र, शिवपंचाक्षरी, मालामंत्र वगैरे तयार होतात. दत्तमाहात्म्यांत तर विशिष्ट अक्षरें सरळ वाचलीं तर भगवद्गीतेचा पंधरावा अध्याय तयार होतो. एवंच हीं स्तोत्रें वगैरे यांचा पाठ केला असतां, जें उक्त फ़ल आहे तें तर मिळतेंच; पण शिवाय त्या त्या देवतेच्या मंत्रजपाचाही लाभ स्तोत्र म्हणणाऱ्यांना होतो. म्हणून हें वाङ्मय अवश्य संग्रहणीय आहे. श्रीगुरुवासुदेवानंदमहाराज, यांची उपास्य देवता श्रीदत्तात्रेय ही आहे व उपासकांचे शास्त्रोक्त पद्धतीप्रमाणें भिन्नभिन्न देवताप्रतीकांमध्येंही उपास्यदेवतेचेंच स्वरूप पाहाणें, सर्वही ईशप्रतीकें उपास्यरूपानें अनुभविणें हें तत्त्व महाराजांचे ठिकाणीं सदोदित जागृत होतें. यामुळें कोणत्याही पुढें आलेल्या संचारांतील देवतांचें स्तवन स्तोत्ररूपांत ते करूं लागले कीं, उपास्य मूर्तीवरचें जें त्यांचें प्रेम तेंच त्या वेळीं प्रगट होत असे. यावरून महाराजांची श्रीदत्तब्रह्माकारवृत्ति कशी पराकोटीस गेली होती हें लक्ष्यांत येईल श्रीएकनाथ, ज्ञानेश्वर, समर्थरामदासादि संतशिरोमणि यांचाही सर्वात्मभाव या कोटींतीलच होता. जे असें पोंचलेले महात्मे असतात त्या सर्वांची स्थिति हीच—सारखीच असते. इतिहासांत हें वर्णन आहे कीं-श्रीसमर्थ रामदासस्वामिमहाराजांनीं पंढरीस श्रीपांडुरंगमूर्तीजवळ श्रीसीतारामचंद्राचें ध्यान स्तवन केलें. तेव्हां श्रीविठ्ठलांनीं समर्थांस श्रीरामरूपानें रामपरिवारासह दर्शन दिलें. अशा पुष्कळ आख्यायिका आहेत. महात्म्यांच्या प्रेममय उपासनेंत त्रिपुटीचा लय होतो व ' यो देवः सोऽहमेव हि ' अशी त्यांची निश्चल स्थिति असते. म्हणजे अधिकारी उपासक हे उपास्यरूपच बनतात. भेदभाव राहात नाहीं. भ्रूशुंडी इत्यादि गणेशभक्त, उपासनाभूमिकेंतील आरुरुक्षुश्रेणींत होते. तरीही साकार गजाननमूर्त्युपासनेनें, उपासनेचा परिपाक होतांच, अखंड उपासनाध्यानबलानें त्यांना गणपतीप्रमाणें शुंडा उत्पन्न झाली व तेव्हांपासून ते भ्रूशुंडी या नामानें प्रसिद्ध गणेशभक्त झाले. ही या भक्तांची सारूप्यस्थिति आहे. याही पुढें विज्ञानसंपन्न आरूढ स्थितींतील जे . असे पुरुष असतात ते सायुज्यास पावलेले,

देह असेपर्यंत जीवन्मुक्त व देहांतीं विदेहमुक्त होतात. याच जीवन्मुक्त स्थितींतील श्रीगुरुमहाराज हे असल्यानें त्यांचा सर्वात्मभाव सहज रीतीनें प्रकट होत असे. श्रीगुरुवासुदेवानंदमहाराजांची ही सर्वात्मभावस्थिति श्रीगुरुभक्त वामनराव गुळवणी यांनीं शिक्षात्रयावरील स्वतःचे निवेदनांत दाखविली आहेच.

श्री. प. प. वासुदेवानंदगुरूंनीं श्रीदत्तोपासनासंप्रदाय भक्तांना दाखवून दिला आहे. श्रीदत्तात्रेय ही देवता, हा अवतार, इतर अवतारांप्रमाणें अवतारकार्य होतांच संपविलेला नसून, तो दत्तावतार जीवांचे कल्याणाकरितां कायम जागरूक आहे व भक्तांनीं कोणीही त्याला आळविलें असतां तो दत्तप्रभु त्यांचे जवळ येऊन आळविणारांचे मनोरथ पूर्ण करतो. म्हणूनच श्रीदत्तराजास स्मर्तृगामी–स्मरण करणाऱ्यांकडे जाणारा अशी अन्वर्थ संज्ञा पडली आहे. अशा श्रीदत्तदेवाचा भक्तिसंप्रदाय महाराजांनीं भक्तांना दाखविला आहे. त्या संप्रदायानुरूप श्रीदत्ताची उपासना, मंत्रजप, नित्यभजनपंचपदीक्रम करणें, स्तोत्रांनीं स्तवन करणें इत्यादिक सर्वही उपासनाक्रम चालविणें हें जिज्ञासु, मुमुक्षु, साधक जनांचें कर्तव्य आहे. सर्वही वाचक मंडळी सुज्ञ श्रद्धालु अशी आहेत. तेव्हां येथें याबाबत विशेष आतां लिहिलें पाहिजे असें नाहीं व जेवढें सुचलें तेवढें लिहिलेंही आहेच. यावरून श्रीवासुदेवानंदमहाराजांचें दिव्य चारित्र्य व त्यांचे ग्रंथरत्नांतील वैशिष्ट्य हीं सर्व वाचकांच्या लक्षांत येतील. असो.

याप्रमाणें हृद्देशस्थ अंतर्यामी ईशानें प्रेरणा केली तसें या लेखांत यथामति प्रकृतास धरून कांहीं व्यक्त, प्रथित केलें आहे. यांत जें दोषबाहुल्य आहे तें माझेंच भावंड अज्ञान, याचेंच अपत्यवर्गांतील मोठे कर्तृ असें अपत्य आहे हें वास्तव सत्य मी नमूद करीत आहें. सार–रस, सिद्धांतानुसारी असा कांहीं यांत असेल तर तो सर्वांनीं घ्यावा. इतकें लिहून हा लेख श्रीसद्गुरूस अर्पण करून विराम घेतों.

वर्षप्रतिपदा शके
१८७४ नंदनसंवत्सर

श्रीसद्गुरुचरणप्रावण्याकांक्षी—
दुंढिराज वक्रतुंड कवीश्वर, वाडीकर.

# अनुक्रमणिका



**नित्यभजनक्रम**

श्रीवासुदेवानंदसरस्वती

# ग्रंथमाला

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १०० | रु. | ग्राहक | क्रमांक | १ |
| ५० | रु. | ,, | ,, | २ |
| २५ | रु. | ,, | ,, | ३ |
| १० | रु. | ,, | ,, | ४ |

वामन दत्तात्रेय गुळवणी,

२० नारायण पेठ, पुणें २.

श्री. प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीटेंबेस्वामिमहाराज



जन्म-शके १७७६ श्रावण वद्य ५. समाधि-शके १८३६ आषाढ शुद्ध १



मालाकमण्डलुरधःकरपद्मयुग्मे
मध्यस्थपाणियुगले डमरुत्रिशूले ।
यस्य स्त ऊर्ध्वकरयोः शुभशंखचक्रे
वन्दे तमत्रिवरदं भुजषट्कयुक्तम् ॥ १ ॥

# श्रीगणेशस्तोत्राणि



## १. श्रीविनायकस्तोत्रम्

वा रणास्यो द रद्नोर्ध्य ए कदं त शिवात्मजः ॥
सु शर्मकृ त्ता रकोर्च्यः क विस्त त्पु रुषप्रियः ॥ १ ॥

दे वः पवि त्रे क्षणोर्द्यो दं ती चा रु स्त्रिलोचनः ॥
वा ग्मीशो मा या तीतात्मा ता पशो षा ख्य आखुगः ॥२॥

नं दीवंद्यो य मीशानो य शस्वी य शआस्पदः ॥
द र्शनीयो वि घ्नराजो वि घ्नहा वि घ्नकृद्विराट् ॥ ३ ॥

स भ्यो हृत्प द्म निलयो द्म रस द्म विहापकः ॥
र क्तांगोर्क्रौ हे ममाली हे रंबो हे मदंष्ट्रकः ॥ ४ ॥

स्व राट् प्रभां अ जोनंतो व रेण्यो म तिमान् गुणी ॥
ती र्थकीर्तिर् व रकरः क्र त्वीशो हा पितासुरः ॥ ५ ॥

कृ पाकरो धू म्रकेतुस् तुं दिलो दे ववल्लभः ॥
त पस्वीशस् ता पहरो डा किनी वा रितो भयः ॥ ६ ॥

वि श्वप्रियो य क्षवंद्यो य ष्टा न य विवर्धनः ॥
ना नारूपो धी र आद्यो धी मतां धी रकः सुधीः ॥ ७ ॥

य मीश्वरो म हाहस्ती म हात्मा म ह उत्तमः ॥
क र्ताऽकर्ता हि तकरो हि तज्ञो हि तशासनः ॥ ८ ॥

स्तो ता स्तव्यस् तं त्रमूलस् तं त्रज्ञस् तं त्रविग्रहः ॥
त्र यी वंद्यो नो दनाज्ञो नो दना नो दितद्विजः ॥ ९ ॥

मि त्राभो म द नस्मेरो दं ती म रु दुपासितः ॥
दं डो प्रम त्तः शास्तार्यस् ती र्थमिं द्रः स्तुतोघहा ॥१०॥

स त्यसंधः प्र काशात्मा, प्र सन्नः प्र णतार्तिहा ॥
मं त्र विद्या चो दितात्मा चो दना चो दिताखिलः ॥११॥

त्र यीधर्मो द शातीतो द क्षोऽभे द उमासुतः ॥
कं नः स दे यात् प्रणुतोऽ यात् स पा यात् सदा भयात् ॥१२॥

इति श्री. प. प श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचितं
समंत्रकं विनायकस्तोत्रं संपूर्णम् ॥

---

## २ गीतिपूर्वं श्रीगणपतिस्तोत्रम्

सुमुख प्रथम स्वनामगायकपालक सेवकमंगलकारक ॥
कामसुपूरक मंगलकारक, त्राहि विनायक भाविकतारक ॥ १ ॥

सिंदूरलेपक मोदकभक्षक, दुर्जनशिक्षक निजजनवीक्षक ॥
अंकुशधारक जगदुद्धारक, लोकविधारक संहारकारक ॥ २ ॥

अशेषकारक शक्तिविधारक, मूषकवाहक सुरदरदाहक ॥
कलौ सुतारक त्वं हि विनायक, पालय सेवकमखिलाकहारक ॥३॥

करुणारससंपूर्णकटाक्षामलवीक्षणैः ॥
योऽनुगृण्हाति भक्तान्स प्रसन्नः सुमुखः स्मृतः ॥ ४ ॥

ये परित्यज्य विहितं निषिद्धं प्रचरंति ते ॥
वक्रास्तान्तुंडयत्येष वक्रतुंडः प्रकीर्तितः ॥ ५ ॥

प्रथमं मंगलायैव गणेशः स्मर्यते बुधैः ॥
सर्वदेवार्चितत्वात्स गणेशः प्रथमः स्मृतः ॥ ६ ॥

स्मरणान्निजभक्तानां सर्वविघ्नान्निवार्य यः ॥
कामान् पूरयति क्षिप्रं गणेशः कामपूरकः ॥ ७ ॥

निवार्यामंगलान्याशु स्मरणाद्गणनायकः ॥
करोति मंगलान्येष ततो मंगलकारकः ॥ ८ ॥

इंद्रादीनां तु देवानां विविधा नायकाः खलु ॥
न नायको गणेशस्य कोऽप्यतोऽसौ विनायकः ॥ ९ ॥

इति श्री. प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचितं गीतिपूर्वं गणपति-
स्तोत्रं संपूर्णम् ॥

---

## ३ संभत्रकं श्रीगणपतिस्तोत्रम्

नमो ग णपते तुभ्यं ज्येष्ठ ज्ये ष्ठाय ते नमः ॥
स्मर णा द्यस्य ते विघ्ना न ति ष्ठ न्ति कदा चन ॥ १ ॥

देवा नां चापि देवस्त्वं ज्येष्ठ रा ज इति श्रुतः ॥
त्यक्त्वा त्वा मिह कः कार्यसिद्धिं जं तुर्गमिष्यति ॥ २ ॥

स त्वं ग णपतिः प्रीतो भव ब्र ह्मादिपूजित ॥
चर ण स्मरणात्तेपि स्युर्ब्र ह्मा द्या यशस्विनः ॥ ३ ॥

परा प रब्रह्मदाता सुरा णां त्वं सुरो यतः ॥
सन्म तिं देहि मे ब्रह्मपते ब्र ह्मसमीडित ॥ ४ ॥

उक्तं ह स्तिमुखश्रुत्या त्वं ब्र ह्म परमित्यपि ॥
कृतं वा हनमाखुस्ते कार ण न्त्वत्र वेद नो ॥ ५ ॥

इयं म हेश ते लीला न प स्प र्श यतो मतिः ॥
त्वां न हे रंब कुत्रापि पर त न्त्रत्वमीश ते ॥ ६ ॥

स त्वं क वीनां च कविर्देव आ द्यो गणेश्वरः ॥
अर विं दाक्ष विद्येश प्रसं नः प्रार्थनां शृणु ॥ ७ ॥

त्वमे क दन्त विघ्नेश देव शृ णवर्भकोक्तिवत् ॥
सत्क वी नां मध्य एव नैका ण्वं श कविं कुरु ॥ ८ ॥

श्रीवि ना यक ते दृष्ट्या कोपि नू नं भवेत्कविः ॥
तं त्वा मु मासुतं नौमि सन्म ति प्रद कामद ॥ ९ ॥

ममा प राधः क्षंतव्यो नति भिः संप्रसीद मे ॥
न न म स्याविधिं जाने त्वं प्र सी दाद्य केवलं ॥ १० ॥

न मे श्र द्धा न मे भक्तिर्न त्व द र्चन पद्धतिः ॥
ज्ञाता व दान्य ते स्मीति ब्रुवे साधनवर्जितः ॥ ११ ॥

कर्तुं स्त वं च तेनीशः प्रसी द कृपयोद्धर ॥
प्रणा मं कुर्वेऽतोऽनेन सदा नं द प्रसीद मे ॥ १२ ॥

इति श्री. प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचितं
समंत्रकं श्रीगणपतिस्तोत्र संपूर्णम्

---

## ४ श्रीगणपतिस्तोत्रम्

द्विरदानन विघ्नकाननज्वलन त्वं प्रमथेशनंदन ॥
मदनप्रतिमाखुवाहन ज्वलनाभासितपिंगलोचन ॥ १ ॥

अहिबंधन रक्तचंदन प्रियदूर्वांकुरभारपूजन ॥
शशिभूषण भक्तपालन ज्वलनाक्षाऽव निजान्निजावन ॥ २ ॥

विविधामरमर्त्यनायकः प्रथितस्त्वं भुवने विनायकः ॥
तव कोऽपि हि नैव नायकस्तत एव त्वमजो विनायकः ॥ ३ ॥

बलिनिग्रह ईश केशवस्त्रिपुराख्यासुरनिग्रहे शिवः ॥
जगदुद्भवनेऽब्जसंभवः सकलान्जेतुमहो मनोभवः ॥ ४ ॥

महिषासुरनिग्रहे शिवा भवमुक्त्यै मुनयो धुताशिवाः ॥
यमपूजयदिष्टसिद्धये वरदो मे भव चेष्टसिद्धये ॥ ५ ॥

गजकर्णक मूषकस्थिते वरदे त्वय्यभये हृदि स्थिते ॥
जयलाभरमेष्टसंपदाः खलु सर्वत्र कुतो वदापदाः ॥ ६ ॥

संकल्पितं कार्यमविघ्नमीश द्राक्सिद्धिमायातु ममाखिलेश ॥
पापत्रयं मे हर सन्मतीश तापत्रयं मे हर शांत्यधीश ॥ ७ ॥

गणाधीशो धीशो हरिहरविधीशोऽभयकरो
गुणाधीशो धीशो विजयत उमाहृत्सुखकरः ।
बुधाधीशो नीशो निजभजकविघ्नौघहरणो
मुदाधीशो पीशो यशस उभयर्धेश्च शरणम् ॥ ८ ॥

इति. श्री. प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचित–
गणपतिस्तोत्रं संपूर्णम्

---

# श्रीसरस्वतीस्तोत्राणि

## ५ श्रीसरस्वतीस्तोत्रम्

हृद्वक्षःस्थितविद्रुमाधिकमदा त्रीशस्य या स्फूर्तिदा
मालापुस्तकपद्मभृच्च वरदा या सर्वभाषास्पदा ॥
या शंखस्फटिकर्क्षनाथविशदा सा शारदा सर्वदा
प्रीता तिष्ठतु मन्मुखे सुवरदा वाग्जाड्यदा सर्वदा ॥ १ ॥

यस्याक्षीणि गुहागतानि हि पदान्येकं त्वनेकेडितं
स्तोतुं तां निगमेडितां बुधकुलं जातं त्वलं व्रीडितम् ॥
ब्रह्माद्या अपि देवता नहि विदुर्यस्याः परं क्रीडितं
प्रारब्धात्र नुतिर्मयेव गुरुणा शार्दूलविक्रीडितम् ॥ २ ॥

अयि सर्वगुहास्थितेऽजिते, मयि तेपांगदृगस्तु पूजिते ॥
त्वदृते नहि वागधीश्वरि, व्यवहारोऽपि परावरेश्वरि ॥ ३ ॥

समयोचितवाक्प्रदे मुदे विदुषां संसदि वादिवाददे ॥
मयि मातरशेषधारणा दयितेऽजस्य सदास्तु तारणा ॥ ४ ॥

यद्धस्ते कमलं च तत्र कमला लीलाविहारी हरि-
स्तस्याः संनिकटेऽस्य नाभिकमले स्याल्लोकमूले विधिः ॥
वेदा भेदभिदो मुखेषु च विधेर्ये स्वप्रमाणा नृणां
तेभ्यो यज्ञविधिस्ततोमरगणा जीवंति सा पातु वाक् ॥ ५ ॥

नमो नमस्तेऽस्तु महासरस्वति प्रसीद मातर्जगतो महस्वति ॥
परेशि वाग्वादिनि देवि भास्वति प्रकाशके तेऽस्तु नमो यशस्वति ॥ ६ ॥

त्रिषष्टिवर्णाऽऽशुगयुक्परा या भूत्वाथ पश्यंत्यभिधाथ मध्या ॥
स्थानप्रयत्नादिवशान्मुखे च या वैखरीति प्रणमामि तां गाम् ॥ ७ ॥

त्वं ब्रह्मयोनिरपरा सरस्वति परावरा ॥
साक्षात्स्वभक्तहृत्संस्थे प्रसीद मतिचेतने ॥ ८ ॥

सरस्वतीस्तुतिमिमां वासुदेवसरस्वती ॥
चक्रे यमनुजग्राह नरसिंहसरस्वती ॥ ९ ॥

इति श्री. प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचितं
श्रीसरस्वतीस्तोत्रं संपूर्णम्

---

## ६ सरस्वतीस्तोत्रम्

जुषस्व बालवाक्यवत्स्तवं ममांब भारति ॥
असत्सदप्यदस्त्वयि भ्रमाद्विभाति केवले ॥ १ ॥

क्षराक्षरात्परं हि यत्त्वमेव तत्पदं ध्रुवम् ॥
जले यथोर्मिबुद्बुदास्तथा त्वयीशजीवदृक् ॥ २ ॥

त्र्यधीश ओंकृतेऽखिलं त्वमेव चास्य मंगलम् ॥
यदर्धमात्रमूर्जितं क्रियाविकारवर्जितम् ॥ ॥ ३ ॥

त्रिसप्तयागसाधिके सुभुक्तिमुक्तिदायिके ॥
स्वरार्णकारणे स्तवः स्वयं नु कैः कृतस्तव ॥ ४ ॥

प्रकाशकप्रकाशके श्रुतिश्रुतादिधारके ॥
त्वमेव सर्वकारणं त्वमेव सर्वतारणम् ॥ ५ ॥

सुशक्तभक्तभावितं हि येन सर्वथा ततम् ॥
तदेव धाम ते वरं यदीक्ष्यते बुधैः परम् ॥ ६ ॥

स्थिराश्चराश्च गोचराः परत्र चात्र वांब ये ॥
त्वदेव तत्समागमः प्रमाणमत्र चागमः ॥ ७ ॥

नमोऽस्तु ते सरस्वति ध्यविवित्र वाजिनीवति ॥
प्रसीद बुद्धिचेतने स्वभक्तहृन्निकेतने ॥ ८ ॥

स्तुतैवं विष्णुजिह्वा सा प्रसन्ना सूनृतेरका ॥
आहाविष्कृत्य चात्मानं तुष्टास्मि वरयेप्सितं ॥ ९ ॥

सकंबलस्य कुरु मे सहायं शंभुगायने ॥
सुस्वरत्वादि यच्छेति ययाचेऽहिः सरस्वतीम् ॥ १० ॥

वागीशाहोमयोरस्तु दिव्यनादरहस्यमित् ॥
स्तोत्रं चास्तु स्खलद्वीध्रुधीजाड्यादिहृत् त्विदम् ॥ ११ ॥

इति कंबलाश्वतरस्तुतिमिषेण कृता सरस्वतीस्तुतिर्वासुदेवानंद-
सरस्वतीविरचिता संपूर्णा

---

# पंचायतनमाहात्म्यानि

## ७ गणेशस्य

निर्विघ्नार्थं हरीशाद्या देवा अपि भजन्ति यम् ।
मर्त्यैः स वक्रतुण्डोऽर्च्य इति गाणेशसंमतम् ॥ १ ॥

जगत्सृष्ट्यादिहेतुः सा वरा श्रुत्युक्तदेवता ॥
गणानां त्वेति मंत्रेण स्तुता गृत्समदर्षिणा ॥ २ ॥

इत्युक्तं तत्पुराणेऽतो गणेशो ब्रह्मणस्पतिः ॥
महाकविर्ज्येष्ठराजः श्रूयते मंत्रकृच्च सः ॥ ३ ॥

मंत्रं वदत्युक्थमेष प्रनूनं ब्रह्मणस्पतिः ॥
यस्मिन्निन्द्रादयः सर्वे देवा ओकांसि चक्रिरे ॥ ४ ॥

स प्रभुः सर्वतः पाता यो रेवान्यो अमीवहा ॥
अतोऽर्च्योऽसौ यश्चतुरो वसुवित्पुष्टिवर्धनः ॥ ५ ॥

वक्रतुण्डोऽपि सुमुखः साधोगन्तापि चोर्ध्वगः ॥
येऽमुं नार्चन्ति ते विघ्नैः पराभूता भवन्ति हि ॥ ६ ॥

ये दूर्वांकुरलाजाद्यैः पूजयन्ति शिवात्मजम् ।
ऐहिकामुष्मिकान्भोगान्भुक्त्वा मुक्तिं व्रजन्ति ते ॥ ७ ॥

## ८ सूर्यस्य

यस्योदयास्तसमये शिवाद्या अपि चाञ्जलिं ॥
बध्नन्ति विश्वसाक्षी स प्रत्यक्षः श्रूयते रविः ॥ १ ॥

यदधीना कालगतिर्यदधीनाः क्रियाः समाः ॥
यन्मंत्रेण द्विजत्वाप्तिर्यन्मंत्रेण कृतार्थता ॥ २ ॥

लौकिक्यपि व्यवहृतिर्यत्प्रसादात्प्रवर्तते ॥
स्मर्यतेऽस्माद्विश्वसृष्टिः सवितुः श्रूयतेऽपि च ॥ ३ ॥

जगतस्तस्थुषश्चात्मा सूर्यस्तं बहुधा जगुः ॥
मूर्तामूर्तं जगत्सर्वं प्राणापानात्मकं श्रुतम् ॥ ४ ॥

प्राणः सूर्योऽपरश्चन्द्रस्तयोः सर्वं प्रतिष्ठितं ॥
श्रीसूर्यकिरणावेशाच्चन्द्रस्यापि च चन्द्रता ॥ ५ ॥

अतश्चन्द्रो न भिन्नोऽस्मात्स सूर्यः सकलात्मकः ॥
यं विना जगदान्ध्यं हि स देवः कैर्न पूज्यते ॥ ६ ॥

तमोऽमुं प्रसतीत्येष दृष्टवादो न तात्विकः ॥
तस्माद्भक्तेष्टदो देवो वरोऽर्कश्चापराजितः ॥ ७ ॥

## ९ सूर्यस्तोत्रम्

स्फोटककुष्ठमुखार्तिहरो हृद्रोगहरोऽघहरोऽरिहरो हृत् ॥
मामकमाशु विशोध्य विवस्वान् पात्वतनुस्त्रितनुः स हि भास्वान् ॥ १ ॥

ध्येय इनः सविता स च देवः सन्मतिदो गतिदो वरभावः ॥
भर्ग इदं वपुरस्य वरेण्यं तिष्ठतु मे हृदयेऽमितपुण्यम् ॥ २ ॥

इति श्री. प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वती-
विरचितसूर्यस्तोत्रं संपूर्णम्

## १० शंकरस्य

ईशावास्यमिदं सर्वं चक्षोः सूर्यो अजायत ॥
इति श्रुतिरुवाचातो महादेवः परावरः ॥ १ ॥

अष्टमूर्तेरसौ सूर्यो मूर्तित्वे परिकल्पितः ॥
नेत्रं त्रिलोचनस्यैकमसौ सूर्यस्तदाश्रितः ॥ २ ॥

यस्य भासा सर्वमिदं विभातीति श्रुतेरिमे ॥
तमेव भान्तमीशानमनु भान्ति खगादयः ॥ ३ ॥

ईशानः सर्वविद्यानां भूतानां चेति च श्रुतेः ॥
वेदादीनामप्यधीशः स ब्रह्मा कैर्न पूज्यते ॥ ४ ॥

यस्य संहारकाले तु न किंचदवशिष्यते ॥
सृष्टिकाले पुनः सर्वं स एकः सृजति प्रभुः ॥ ५ ॥

सूर्याचन्द्रमसौ धाता यथापूर्वमकल्पयत् ॥
इति श्रुतेर्महादेवः श्रेष्ठोऽर्च्यः सकलार्चितः ॥ ६ ॥ *

विश्वं भूतं भवद्भव्यं सर्वं रुद्रात्मकं श्रुतम् ॥
मृत्युंजयस्तारकोऽतः स यज्ञस्य प्रसाधनः ॥ ७ ॥

विषमाक्षोऽपि समदृक्साशिवोऽपि शिवः स च ॥
वृषसंस्थोऽप्यतिवृषो गुणात्माप्यगुणोऽमलः ॥ ८ ॥

यदाज्ञामुद्वहन्त्यत्र शिरसा सासुराः सुराः ॥
अन्नं वातो वर्ष इतीषवो यस्य स विश्वपाः ॥ ९ ॥

भिषक्तमं त्वां भिषजां शृणोमीति श्रुतेरयं ॥
स्वभक्तसंसारमहारोगहर्तापि शंकरः ॥ १० ॥

## ११ शक्तेः

शिवोऽपि शक्तियुक्तश्चेत्प्रभुः कार्याय नान्यथा ॥
स्वमायया त्रिनेशस्य परस्यानुभवात्मनः ॥ १ ॥

न घटेतार्थसंबंधस्ततो माया परावरा ॥
यस्याः प्रभावं प्रवक्तुं ब्रह्माद्या अप्यलं बलम् ॥ २ ॥

वैष्णवीयं महामाया सुरासुरमुनिस्तुता ॥
शय्यां देवमयीं कृत्वा शेतेऽसाविति गीयते ॥ ३ ॥

सर्वे देवाश्च मुनयो विषमे यां स्तुवन्ति हि ॥
सृष्टिस्थितिविनाशानां हेतुरेका सनातनी ॥ ४ ॥

विदुषोऽपि हठाच्चेतो महामोहाय यच्छति ॥
अभक्तानां बन्धहेतुर्भक्तानां मुक्तिदा च सा ॥ ५ ॥

सर्वेष्वपि हि भूतेषु चेतनेत्युच्यते ततः ॥
स्वात्मारामो शिवोऽप्यत्र रत्यर्थमनुधावति ॥ ६ ॥

माया चतुष्कपर्दाऽसौ युवतिर्नित्यनूतना ॥
सुपेशा च घृतास्यादौ वस्तेस्य वयुनान्यपि ॥ ७ ॥

भक्तिश्रद्धाधृतिह्रीश्रीधीमेधाद्यैश्च सत्सु या ॥
तृष्णालक्ष्याऽऽर्तिभीनिद्रातन्द्रारूपैरसत्सु च ॥ ८ ॥

क्षणे क्षणे विमुह्यन्ति वशिनोऽप्यत्र योगिनः ॥
सैषानिर्वचनीयाचर्या या ह्यनादिरजा श्रुता ॥ ९ ॥

## १२ विष्णोः

विष्णोर्हास्यमसौ माया तदाधारा जडाधमा ॥
प्रध्वंसोऽस्या अनादेश्च विष्णोः पद्विलोचनात् ॥ १ ॥

प्रोक्षुन तिजवरि ओंकारा लिहुन। भिक्षा करावया प्रभु सिद्धचि होऊन। राहति तेंव्हां द्विजसति कण्हेर वाढून। दे यावनालमय ती प्रेमभरें करुन ॥ २ ॥ प्रसन्न होउन श्रीगुरु मिटक्या मारून। भुरकिति निजहस्तें ज्या अद्यापि न हवन। तृप्त करी तो भुरकुन तृप्तचि होऊन। सर्वांसि तृप्त करिती कौतुक दाऊन ॥ ३ ॥ तें तूं गुरुकरशाखाचिन्हित जें अससी। आठहि सिद्धी नवनिधि राबति तुजपाशीं। भजकांच्या तूं सर्वहि कामा पुरवीसी। अश्रांत अन्नपूर्णा निवसे तुजपासीं ॥ ४ ॥ दारिद्र्यदुःखपीडारोगादिक हरिसी। भजकाचीं तूं यास्तव गुरु वरवत् घेसी। नित्य त्रिकाळ अर्चन वरदानहि देसी। हो वासुदेव यतिमति हृष्ट तुझ्यापाशीं ॥ जय जय० ॥ ५ ॥

---

## २०९ आरती भैरवाची

इदमार्तिक्यं स्वीकुरु जय जय भैरव ते, मन्तुः प्रपदे नीराजय उत्तमकीर्ते ॥ ध्रु० ॥ वादें भिडतां विधि हरि शिव आला त्यांतें। सुरपति अवमानी मग शिक्षाया त्यांते ॥ देवें भैरव निर्मुनि पञ्चम शीर्षातें। वामकरें तोडवुनी सोड म्हणे विधितें ॥१॥ नंदन हें न बरें त्वां केलें करिं शिरतें। दन्तुर घेवुनि भिक्षा करिं जा तीर्थातें ॥ सत्वर वैकुंठीं ये विष्वक्सेनातें। रगडी तृप्त करी हरि निज रक्तें त्यातें ॥२॥ स्वच्छन्दें घे विधिशिर विष्वक्सेनातें। तीर्थी काशीमध्यें विष्वक्सेनातें ॥ कुवा पडलें तेथें विधिशिर तें। तात्कालिक विश्वेशें वर दिधला त्यातें॥ ३॥ भैरवपूजेवांचुनि सफल न यात्रा ते। रक्षीं क्षेत्रा जेथें पडलें विधि-शिर तें ॥ वन्द्य कपालविमोचन तारक तीर्थचि तें। स्यन्दद्यशःप्रवाह क्षेत्रप नमुं त्यातें ॥ ४ ॥

इति ब्र० भू० प० प० श्रीमद्वासुदेवानन्दसरस्वतीयतिविरचितं भैरवार्तिक्यं समाप्तम् ॥

---

# आरत्यानंतर प्रार्थना

## २१० धांवा–( चाल-बाळा जो जो रे )

उद्धरिं गुरुराया। अनसूया–तनया दत्तात्रेया ॥ ध्रु० ॥ जो अनसूयेच्या, भावाला भुलुनियां सुत झाला ॥ दत्तात्रेय अशा नामाला मिरवी, वंद्य सुराला ॥ तो तूं मुनिवर्या, निज पायां, स्मरतां वारिसि माया ॥१॥ जो माहूरपुरीं शयन करी, सह्याद्रीचे शिखरीं ॥ निवसे, गंगेचें स्नान करी, भिक्षा कोल्हापुरीं ॥ स्मरतां दर्शन दे, वारि भया, तो तूं आगमगेया ॥ २ ॥ तो तूं वांझेसी, सुत देसी, सौभाग्या वाढविसी ॥ मरतां प्रेतासी जीवविसी, सद्वरदाना देसी। यास्तव वासुदेव तव पाया, धरि त्या तारीं सदया ॥ ३ ॥ उद्धरिं गुरुराया० ॥

---

## २११ गुरुस्तुति (गाणगापूर)

जो सत्य आहे परिपूर्ण आत्मा। जो नित्य राहे उदितप्रभात्मा ॥
ज्ञानें जयाच्या नर हो कृतार्थ। तो पूर्ण आनंद गुरू समर्थ ॥ १ ॥
अखंड आत्मा अविनाशि दत्त। तया पदीं लाविति जे स्वचित्त ॥
चित्तभ्रमा सोडिति ते कृतार्थ। तो पूर्ण आनंद गुरू समर्थ ॥ २ ॥
जो जागृतिस्वप्नसुषुप्तिसाक्षी। जो निर्विकारें सकलां निरीक्षी।
वीक्षी परी ज्यासि नसे निजार्थ। तो पूर्ण आनंद गुरू समर्थ ॥ ३ ॥
जळीं स्थळीं सर्वहि वस्तुमाजीं। व्यापूनि राहेचि तयासि राजी ॥
जो ठेवि भावें नर हो कृतार्थ। तो पूर्ण आनंद गुरू समर्थ ॥ ४ ॥
जें दृश्य तें रूप नसे जयाचें। दृश्यांत राहे अविकारि ज्याचें ॥
स्वरूप तोची अविनाशि अर्थ। तो पूर्ण आनंद गुरू समर्थ ॥ ५ ॥

दृश्यासि घेतां न च घेववें जें। स्वरूप तटस्थ प्रभुचें स्वतेजें ॥
स्वयें प्रकाशे जगिं जो परार्थ। तो पूर्ण आनंद गुरू समर्थ ॥ ६ ॥
असोनि सर्वत्र गुरुप्रसादा-। विना न लागे करतांहि खेदा ॥
भेदाचि वार्ता करि जो अपार्थ। तो पूर्ण आनंद गुरू समर्थ ॥ ७ ॥
अनन्यभावें भजतां अनन्य-। लभ्य प्रभू जो न च होयि अन्य ॥
संन्यस्तसर्वेषणतारणार्थ। तो पूर्ण आनंद गुरू समर्थ ॥ ८ ॥
मागे तुकाराम तयासि दत्त। दे वासुदेवा करुनी निमित्त ॥
हें स्तोत्र चिन्मात्रपदा समर्थ। घ्याया हराया सकलाध्यनर्थ ॥ ९ ॥
गाणगापुरिं अठ्ठाशें सत्तावीस शकामधीं। उदेलें स्तोत्र हें आधिव्याधि
हारी हरी कुधी ॥ १० ॥

इति श्री० प० प० श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचिता गुरुस्तुतिः ॥

---

## भामिनीषट्पदी (कर्नाटक वृत्त)

निर्गुणात्मक विश्वव्यापक। कलिमलांतक कालकंटक। धन्य सद्गुरु भक्तवत्सल दत्त अवधूता। सगुण होउनि पूर्ण करिशी। भक्तवांछा विमलतेजाऽऽ-। नंदमूर्ते नमः श्रीगुरुदत्त अवधूता ॥ १ ॥

---

## २१२ श्रीगुरुकरुणाष्टक (कामदा वृत्त)

श्रीगुरो निराकार निर्गुणा, स्वामि सच्चिदानंद कारणा ॥
अद्वयाऽव्ययाऽनंत मानदा, हंसमानसा ते नमः सदा ॥ १ ॥
भूतळावरी दैवतें अती, स्तब्ध जाहलीं देखुनी मती ॥
कर्म कोणतें धर्म आपला, हें कळावया जीव तापला ॥ २ ॥
ज्ञान भक्ति वैराग्य सर्वथा, सद्गुरूकृपेवांचुनी वृथा ॥
बोलती असें थोर थोर जे, तारिले पदाच्या तुझ्या रजें ॥ ३ ॥

योगयागविद्याकलागती, मंत्र तंत्र ना सिद्धि पावती ॥
सद्गुरूविणें याच कारणें, सद्गुरो तुला हाक मारणें ॥ ४ ॥

धन्य सद्गुरू दत्तस्वामिया, भक्तसंकटीं दाविसी दया ॥
तारिसी अनाथासि भाविका, हे भवाब्धिच्या सूज्ञ नाविका ॥ ५ ॥

जाहला असे व्यर्थ जन्म हा, निर्मिलीं बहू पातकें महा ॥
मायदृष्टिनें कोण पाळिल, तूंजवांचुनी कोण तारिल ॥ ६ ॥

वर्णिलीं तुम्हीं सत्कथानकें, नामधारकालागिं तारकें ॥
शोधिती जनालागिं कामना, सिद्धि पावती सर्व कामना ॥ ७ ॥

तूझिया कृपें मानमान्यता, होतसे जगीं हें न अन्यथा ॥
त्वत्कृपाश्रितोदुंबराप्रती, कल्पवृक्ष मानूनि पूजिती ॥ ८ ॥

श्रीगुरो तुझी मानवी तनू, हंसरूपिणी सिद्ध आसनू ॥
दंडपात्र काषाय अंबर, अंतरीं वसो दे निरंतर ॥ ९ ॥

देइ दर्शना हे कृपाकरा, तारिं विश्वनाथा कृपाकरा ॥
पाठका सदा सौख्यसंपदा-युक्त पूर्वा हेतु कामदा ॥ १० ॥

उपेंद्रवज्रा वृत्त

गुरो तुझी ही पदवारिधारा, धुवो सदा कायिक दोष सारा ।
सदैव माझें मन वाणि शुद्ध करो, तुझें नाम पवित्र सिद्ध ॥ १ ॥

---

## २१३ श्रीदत्तप्रार्थना (कामदा छन्द)

व्यर्थ हट्टि मी सांडुनी त्रपा । बाहतों तुला व्या नये कृपा ॥
रंक पापि मी तूं रमापती ॥ तैं कशी मशीं होय संगती ॥ १ ॥

माझे अंगणीं घेवडा नसे । वांझमहिषिचें दूधही तसें ।
बाळतें जरी दारिं या मढें । धांवतें तुझें चित्त रोकडें ॥ २ ॥

असतीच निंदा मदंतरीं । होति फावती तूज बा तरी ।
जाहला न विद्यामद मला । फावती कशी होय बा तुला ॥ ३ ॥
ताडिते जरी चोर हें शिर । धांवता तरी हो मुनीश्वर ।
गांजिती जरी क्रूर सुंदरी । बाहतास तूं बा मला तरी ॥ ४ ॥
बा दिवाळिचा ये जरी क्षण । ये त्वदागमा योग्य कारण ।
राज्य असतां तूं पहावया । येसि बा नसें तें कपाळिं या ॥ ५ ॥
कर्मे माझिया आण घातली । बा तुला तरी ती करी खुली ॥
दीधल्या विना येसि ना जरी । अर्पि सत्य सर्वस्व ते करीं ॥६॥
कामकाक हा त्वत्पदीं वसे । यास्तव तुझा आगम नसे ।
भक्तमानसहंस शीघ्र या । कामकाक जाईल उडोनिया ॥७॥
माझि आण दत्ता असे तुला । दावि पाउला कीर्तनीं मला ।
जीवनाविना मीन तळमळे । तुजविणें तसा येथ मी लोळे ॥८॥

---

## २१४ श्रीदत्तदिनचर्या

अनसूयागर्भरत्न अवधूत दिगंबर ॥
त्रिमूर्ति जो योगिवर अत्रिपुत्र महेश्वर ॥ १ ॥
कधीं योगी कधीं भोगी कधीं नग्न पिशाचसा ॥
काशीमधें स्नान करी ध्यान तें गाणगापुरीं ॥ २ ॥
कुरुक्षेत्रीं आचमन धोपेश्वरीं विलेपन ॥
संध्या करी कऱ्हाडांत भिक्षा कोल्हापुरांत जो ॥ ३ ॥
भिक्षा सारापुरीं सारी पंढरींत सुगंधि घे ॥
असी फेरी नित्य करी संध्या पश्चिमसागरीं ॥ ४ ॥
वसे सह्याद्रिशिखरीं निजे जो माहुरीपुरीं ॥
स्मरतां भेट दे दत्त तो चित्तगत सर्वदा ॥ ५ ॥

## २१५ श्रीदत्ताष्टक

दोधकवृत्त तुझें यश गाया । बोधकरा रुचतें गुरुराया ।
साधक बाधक कांहिंच नेणें । साधकता मज सत्वर देणें ॥१॥

बोधक हे कविता अखिलांतें । चोदक तूं करि तादृश ईते ।
प्रेरक नाहीं तरी मग आशा । मोदक केवळ खास परेशा ॥२॥

अत्रिसुता अजिता भगवंता । तूं त्रिगुणात्मक तारक दत्ता ।
तारिं मला विमला अनसूया-। पुत्र पवित्रचरित्र सुगेया ॥३॥

तूं सकलात्मक शोक निवारी । तूं मन दोष अशेष निवारी ॥
तूं भववारिधिपासुनि तारीं । तूं परमार्थद एक भवारी ॥४॥

कोण दयाळु नसे सम दाता । तूं शमवी मम चंचल चित्ता ।
आजि तुझ्या पदिं ठेवुनि माथा । प्रार्थितसें अजि तारिं अनाथा ॥५॥

पापि जरी परि नाम तुझें मी । गात असें मग पापि कसा मी ।
नाम न वारिल पातक ऐसें । कोण करील कि पातक तैसें ॥ ६ ॥

हें समजूनि मदंतर धीर । नामिं तुझ्या धरि होवुनि शूर ।
कुंजरशौचवदन्य उपाय । नाम समूळचि वारि अपाय ॥ ७ ॥

काय वदूं घडलें किति पाप । अक्षय देयिल जें बहु ताप ।
आसुर जो निजरूपाचि चोरी । सर्व तयावरि ये अघ भारी ॥८॥

हें समजूनचि बोलत वासु-देव सरस्वति जोंवरि सासु ।
तोंवरि गावुं सुनामचि तूझें । वारि शिरोगत पातक ओझें ॥९॥

इति० दत्ताष्टक ॥

---

## २१६ श्रीगंगाष्टकम् ॥

न जाणे मी धर्मा न च विहित कर्मा अवगमा ॥
न जाणे मी शर्मा न च विहित आधार महिमा ॥
कुकर्मासी कामाकुलित कृतकर्माचि सुभगे ।
मला तारीं गंगे सकलभयभंगे त्रिपथगे ॥ १ ॥
न केव्हांही येथें सुकृतलव संपादित असे ।
न पूर्वीचें कांहीं सुकृत पदरीं भासत असे ॥
पुढेंही श्रेयाची गति न च दिसे खास मज गे ।
मला तारीं गंगे सकलभयभंगे त्रिपथगे ॥ २ ॥
न साधूच्या संगा क्षणभरि धरी भक्ति न करी ।
सुतीर्थाक्षेत्राची पदवि बरवी ती हि न धरी ॥
न देवाचे द्वारीं क्षणभर ठरे देवि सुभगे ।
मला तारीं गंगे सकलभयभंगे त्रिपथगे ॥ ३ ॥
न केलें बैसोनी क्षणभरि पुराणश्रवणही ।
कुकर्माच्या गोष्टी करुनि वय नेलें सकलही ॥
कदा काळीं नेणें हरिभजन तेंही न सुभगे ।
मला तारीं गंगे सकलभयभंगे त्रिपथगे ॥ ४ ॥
असा हा मी पापी शरण तुज आलों हरिसुते ।
तुं या वारी पापा शमवि मम तापा सुरसुते ॥
तुवां हातीं घेतां मग मजासि कांहींच न लगे ।
मला तारीं गंगे सकलभयभंगे त्रिपथगे ॥ ५ ॥
महापापी तुझ्या अमृतजलपानेंचि तरले ।
सुकृत स्नानें गेले उपरि न च तेही उतरले ॥
असें मी ऐकोनी अयि शरण आलोंचि तुज गे ।
मला तारीं गंगे सकलभयभंगे त्रिपथगे ॥ ६ ॥

त्रितापघ्नी ऐसें निजबिरुद तूं पाळि सदये ।
त्रितापघ्नी ऐसें यशहि तव सांभाळि सुनये ॥
अये योगिध्येये निगमगणगेये श्रितभगे ।
मला तारीं गंगे सकलभयभंगे त्रिपथगे ॥७॥

महापापी नेले असिसि जरि उद्धारुनि परे ।
तयाहूनि श्रेष्ठा अजि मग आई उद्धरि बरें ॥
तरीच प्रख्याती करिशि जगतीमाजि सुभगे ।
मला तारीं गंगे सकलभयभंगे त्रिपथगे ॥८॥

इति० प०प० श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचितं श्रीगंगाष्टकं संपूर्णम् ॥

---

## श्रीमत्सौभाग्यसुन्दरीस्तोत्रम् ॥

सौभाग्यसुन्दरि, गौरि, दौर्भाग्य माझें वारीं ॥ ध्रु० ॥

जसि शंकर तुजवरि प्रीति ठेवितो सन्तत चित्तीं ॥
मत्पती मजवरि प्रीती तसि ठेवो सन्तत सुमती ॥
॥ चा० ॥ सौभाग्यसुंदरि गौरी, गिरिधरशंकरनारी ॥
परिहरीं दुःखें सारीं मज धरीं स्वकरीं गौरी ॥ १ ॥

मम भर्ता वल्लभ होयी ऐसा तूं मज वर देयीं ॥
सौभाग्य अक्षय देयीं रूपही उत्तम देयीं ।
देयीं भाग्यहि देयीं पुत्र पौत्र उत्तम देयीं ॥
( पुत्र पौत्र उत्तम देयीं ) धनधान्य अक्षय देयीं—
सर्व काम दे ईश्वरी ॥ २ ॥

वदली अरुन्धती ऐसी ख्यात्याख्य भृगुपत्नीसी ॥
मग ख्याती आचरे तीसी फळ आलें यास्तव ऐसी ॥
भाव ठेवुनि निज मानसीं, जी नारी प्रार्थी तीसी ॥
सौभाग्य सुन्दरि खूशी होयिल हें मनिं निर्धारीं ॥ ३ ॥
दौर्भाग्य माझें वारी, सौभाग्यसुन्दरि गौरि, दौर्भाग्य माझें वारी ॥

इति० ब्र० भू० प० प० श्रीमद्वासुदेवानन्दसरस्वतीयतिविरचितं सौभाग्यसुन्दरीस्तोत्रम् ॥

---

## २१८ श्रीरेणुकास्तोत्रम्

नमस्ते रेणुके देवि भाविकाभीष्टकामदे ।
परिरक्षी सदा मातें माते तूं सर्व वारिणी ॥१॥
नेणें तुझें अर्चन मी नेणें मंत्र जपादिहि ।
पुण्यही पदरीं नाहीं नाहीं भक्ति तुझ्या पदीं ॥२॥
मीं जरी आळसी मंद तरी त्वद्भक्तपूर्वज ।
पूर्वजांच्या सुपुण्यानें पदरीं धरिं तूं मला ॥ ३ ॥
वारी पाप हरी ताप दुःखापरी हरी वरे ।
पळोत भीति घेऊनी शत्रू दाहि दिशा शिवे ॥ ४ ॥
मिळो सर्वत्र विजय विजया तूंचि कामदा ।
निवास करिं तूं माझे हृदयीं देवि हर्षदे ॥ ५ ॥
डोळां भरो रूप तुझें मुखीं नाम सदा वसो ।
तुझें ह्या हृदयीं पादपद्म राहो निरंतर ॥ ६ ॥
विश्वोत्पत्तिस्थितिलया करिसी तूं जगन्मये ।
तूं मोहवूनि ह्या जीवां संसारीं ठेविसी सदा ॥ ७ ॥

पदा तुझ्या भजति जे त्यांची हरिसि आपदा ॥
सदाश्रिते जाणुनि हें पडलों मी तुझ्यापुढें ॥ ८ ॥
प्रसाद करि तुं माते मातापुरनिवासिनि ।
धरूनिया निजकरी अपराध क्षमा करी ॥ ९ ॥

इति श्री० प० प० श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचितं
रेणुकास्तोत्रं संपूर्णम्॥

---

## २१९ श्रीत्रिपुरान्तकस्तोत्रम् ( हावनूर )

तापत्रयानें अति तापलों शिवा । विश्रांति कोठें न मिळे उमाधवा ॥
भवाब्धिनावा तव पाद हे हरा । तारी मला तूं त्रिपुरांतकेश्वरा ॥ १ ॥
हा कामरुड्लोभदवाग्नि पेटला । तच्छांतिकर्ता मजला न भेटला ॥
दयाघना हा निववी महेश्वरा । तारी मला तूं त्रिपुरान्तकेश्वरा ॥ २ ॥
देवा अहंता ममता पिसाळल्या । ह्या शाकिनी डाकिनि अंगिं झोंबल्या ।
हा लोभ वेताळ गिळेल कीं मला । तारी मला तूं त्रिपुरान्तकेश्वरा ॥ ३ ॥
नको नको हा भवजाच साच तूं । विमुक्तिहेतू वर काढि हात तूं ॥
धरूनि माझा सदया उमेश्वरा । तारी मला तूं त्रिपुरान्तकेश्वरा ॥ ४ ॥
मी पातकी केवळ बुद्धिमंद हा । महामति तूंचि उदार पाप हा ।
माझ्या शिरीं तूं धरि हात शंकरा । तारी मला तूं त्रिपुरान्तकेश्वरा ॥ ५ ॥

---

( सायंकाळीं )

## २२० नित्यभजनक्रम ( पंचपदी )

पद गणपतीचें. ताल दादरा.

( चाल—भज भज भव जलधि माजी )

जय जय गजवदन मदनकोटिसुषुमधामन ॥ ध्रु० ॥ हिमनग-

जातनय विनय ।। हिमकरधर सदयहृदय ।। हतसुररिपुनिचय अभयवरदशय सुधामन् ।। १ ।। चित्त करुनि भक्ति विमल ।। चिंतिति तव पादकमल, विघ्न हरुनि त्यांसि सकल ।। काम देसि भूमन् ।।२।। वक्रतुंड चंद्रकिरण ।। चक्रभसुर वरद शरण ।। शक्रमुखध्यातचरण ।। शरणदाधिमहिमन् ।। ३ ।। जे सर्वारंभिं आधिं ।। आठविती तुज तदाधि ।। वारिसि तूं सुरगणाधिपाधिपा महात्मन् ।। ४ ।। वासुदेवचित्तरमण, भाविकनिजभक्तशरण ।। करुणाकर पूज्यचरण विघ्नहरणभूमन् ।। ५ ।। जय जय गजवदन० ।।

---

## २२१ श्रीसरस्वतीचें ध्यान

दोर्भिर्युक्ता चतुर्भिः स्फटिकमणिमयीमक्षमालां दधाना । हस्तेनैकेन पद्मं सितमपि च शुकं पुस्तकं चापरेण ।। या सा कुंदेंदुशंखस्फटिकमणिनिभा भासमाना समाना । सा मे वाग्देवतेयं निवसतु वदने सर्वदा सुप्रसन्ना ।। १ ।।

---

## २२२ पद सरस्वतीचें ( चाल—वैशाख मास० )

देवो मति जी सद्गति ती सरस्वती ।। श्रुति गाती जिची कीर्ति तीच भारती ।। धृ ०।। चिन्मय तूं वाङ्मय तूं असमि भारती ।। करविसि तूं वदविसि तूं तूं जगद्गति ।। १ ।। ये धाउनि स्तुति परिसुनि मो सरस्वती ।। मति देउनि जाड्य हरुनि तारि भारती ।। २ ।।

---

## २२३ अभंग

चिंतूं दत्तात्रेया अनसूयातनया ।। श्रुतिगणगेया ध्येया वंद्या ।। १ ।। वराभयकर सिद्धासनावर ।। बसे निरंतर सुरवर्य ।। २ ।। जो खेचरी

मुद्रा लावी सोडी तंद्रा ॥ सदा योगनिद्रा मुद्रायुक्त ॥ ३ ॥ प्रफुल्ल-लोचन सुहास्यवदन ॥ दयेचें सदन मनमोहन ॥ ४ ॥ स्मरता जो भक्तां भेटे वासुदेव ॥ स्वचित्ती सदैव भावें चिंती ॥ ५ ॥

## २२४ अभंग

तूंचि जीवलगा सखा माझा सगा ॥ दत्ता मज कां गा झुगारिसी ॥ १ ॥ झुगारिसी तरी ब्रह्मांडाबाहेरी ॥ झुगारी ना तरी धरी पोटीं ॥ २ ॥ पोटींचें जें बाळ वेडें हो ओंगळ ॥ माय परिपाळ करी लोकीं ॥ ३ ॥ लोकीं दत्ता ख्यात आमुचा तू तात ॥ मी बा तुझा पोत हात धरीं ॥ ४ ॥ धरी वासुदेवा करीं दत्तदेवा ॥ जरी तव सेवा भावा नेणें ॥ ५ ॥

## २२५ अभंग

आतां वाटे लाज किती बाहूं तूज ॥ उपेक्षिसी मज आज तूं कां ॥ १ ॥ तूं कारणभूत असती अनंत ॥ होई माता अंत अंतरतां ॥२॥ मरतां मी येसी मग कासयासी ये या समयासी सोडी सर्व ॥ ३ ॥ सर्व तुझेसाठीं सोडुनि हिंपुटी ॥ येतां न शेवटीं पोटीं धरिसी ॥ ४ ॥ धरिसी काठिण्य जरी तूं वरेण्य ॥ बा तुझें कारुण्य पुण्य लोपे ॥ ५ ॥ झोपेमाजी आतां न जायी तूं दत्ता ॥ वासुदेव भक्ता युक्त पाही ॥६॥

## २२६ अभंग

पाही मजकडे बापा घेई कडे ॥ बालक मी वेडें रडे पुढें ॥ १ ॥ पुढें आड येतां भुकेनें रडतां ॥ निजबाळा माता लाथा दे कीं ॥ २ ॥ लाथा दे कीं हाण परि धरीं चरण ॥ मज तूजवीण कोण त्राता

॥ ३ ॥ त्राता तूंचि एक मी बा तुझा लेक ॥ तूं माय जनक एक दत्ता ॥ ४ ॥ दत्ता माता पिता विभिन्न असतां ॥ न दे जरी माता पिता देई ॥ ५ ॥ वासुदेवा आतां तूंचि माता पिता ॥ त्वां इष्ट न देता दाता कोण ॥ ६ ॥

## २२७ अभंग

कोण या जगाचा करी परिपाळ ॥ होऊनि कनवाळ काळत्रयीं ॥ १ ॥ काळत्रयीं मान्य असा न वदान्य ॥ तुजविण अन्य धन्य दत्ता ॥ २ ॥ दत्ताऽभय तूंचि माउली विश्वाची ॥ कां वासुदेवाची पर्ची करिसी ॥ ३ ॥

## २२८ अभंग

करिसी कां आतां हयगय दत्ता । पदीं ठेवीं माथा नाथा भेट ॥ १ ॥ भेटसी स्मरतां ह्या वचना आतां ॥ बाधा नाणी दत्ता आतां न नीज ॥ २ ॥ निजशीं कीं माहुरीं सह्यागिरीवरी ॥ वससी काशीपुरीं न्हाशी कीं तूं ॥ ३ ॥ कीं तू गाणगापुरीं करिसी ध्यान हरी ॥ किंवा कुरुक्षेत्रीं आचमन ॥ ४ ॥ मन हो माझें भ्रांत कीं तूं कऱ्हाडांत ॥ संध्यावंदनांत गुंतलासी ॥ ५ ॥ तल्लासि न तूझी लागे वासुदेवा ॥ कोण तुझ्या भावा जाणे दत्ता ॥ ६ ॥

## २२९ अभंग

दत्ता घोपेश्वरीं करिसी कीं अंगीं ॥ भस्मलेप वेगी कां न येसी ॥ १ ॥ न येसी भिक्षेसी गुंतूनियां दत्ता । कोल्हापुरीं आतां ताता कीं तूं ॥ २ ॥ कीं तू पंढरीची सुगंधी हुंगसी ॥ पांचाळीं भुक्तीसी

बससी कीं ॥ ३ ॥ बससी पश्चिमसागरीं निकाम ॥ वासुदेवें नाम घेतां दत्ता ॥ ४ ॥

---

## २३० अभंग

दत्ता कार्तवीर्य अर्जुन ये वेळां ॥ आला कीं यदूला पाहिला कीं ॥१॥ की अलर्कभक्त कीं ये नित्ययुक्त ॥ प्रह्लाद जो मुक्त सक्त पदीं ॥ २ ॥ पदीं आयुराजा पडे कीं बा तुझ्या ॥ विष्णुदत्त द्विजा भेटसी कीं ॥३॥ किंवा भार्गवराम पातला सुधाम ॥ सोमकांत नाम राजा ये कीं ॥४॥ कीं अनघा पूसे कोठें जातां असें ॥ दुःशकुन ऐसे मानसी कीं ॥५॥ कीं दुर्दैव माझें आड पुढें आले ॥ म्हणोनी न केलें आगमन ॥ ६ ॥ पुरे हा संशय न होय निश्चय ॥ वासुदेव पाय चिंती तुझे ॥ ७ ॥

---

## २३१ अभंग

तुझे दुजे भक्त करिती जरी धांवा । अवतार घ्यावा देवा दुजा ॥१॥ दुजा अवतार धराया उशीर । लागेल कीं फार मायानाथा ॥२॥ नाथा दुष्कर याज्ञा करीन म्हणून । भीसी तरि मी न आन मागें ॥३॥ न मागें वैकुंठ तुझी ती मिरास । तिची न आम्हांस खास आस ॥४॥ आस रिद्धि सिद्धी चतुर्मुक्तीची न । मी तुम्हांवरून ओंवाळी त्या ॥५॥ त्या हो ब्रह्मलोकाचीहि नको वार्ता । बंधुचा तो वांटा कासया बा ॥६॥ बापा तुं समर्थ मग मी किमर्थ । दुसऱ्याचा अर्थ व्यर्थ मागूं ॥७॥ मागूं तेंचि धन दे तुझे दर्शन । वासुदेवा आन धन नको ॥ ८ ॥

---

## २३२ भजन

कृष्णातिरिच्या वसणाऱ्या । ये औदुंबरीं बसणाऱ्या ।। ध्रु० ।। काषायांबर घेणाऱ्या । पायिं पादुका घालणाऱ्या ।। १ ।। भस्मोध्दूलन करणाऱ्या । दंडकमंडलु घेणाऱ्या ।। २ ।। स्वभक्तसंगे असणाऱ्या ।। भक्ताभीप्सित करणाऱ्या ।। ३ ।। स्मरतां दर्शन देणाऱ्या वासुदेवाच्या कैवाऱ्या ।। ४ ।। कृष्णातिरिच्या० ।।

---

## २३३ अभंग

नको देवूं मज तूं देवा ।। त्रिभुवनाच्या वैभवा ।।१।। भव हरीना त्या कोण ।। व्यर्थ मागें व्याया शीण ।। २ ।। शीण जन्मजन्मांतरींचा वारी लोभ धरूं त्याचा ।। ३ ।। त्या चाखूं इच्छी पदा ।। मज दावी तें गोविंदा ।। ४ ।। गोविंदा तुझ्या पदा ।। वासुदेवा दे सानंदा ।। ५ ।।

---

## २३४ अभंग

नंदन जो अनसूयेचा ।। तो तूं कैवारी आमुचा ।। १ ।। आमुचा तूं म्हणो जरी ।। भेट कां न देसी हरी ।। २ ।। हरी माझी अंतर्व्यथा पद दावी तुझे नाथा ।। ३ ।। नाथा आलों काकूळती ।। कळकळसी न कां चित्तीं ।। ४ ।। कां चित्तीं न ये दया ।। वासुदेवाची गुरुराया ।। ५ ।।

---

## २३५ अभंग

गुरुराया दत्ता तुज किती आतां ।। बाहूं कृपावंता भक्ताधारा ।।१।। भक्ताऽऽधार होसी तरी कां आम्हांसी ।। भेट तूं न देशी संकटीं ह्या ।। २ ।। ह्या वेळीं हा गळा वाळला हा डोळा ।। ताठला कृपाळा तूं

न येतां ॥३॥ तूं न येतां आतां हंसती दुर्जन ॥ हें कोणा लांछन दयाघना ॥ ४ ॥ दयाघना दत्ता असें विनवितां ॥ वासुदेव चित्ता इष्ट करी ॥ ५ ॥

---

## २३६ अभंग

ये बा ये बा बापा दत्ता ॥ चित्तासनीं बैसे आतां ॥ १ ॥
आतां स्वागमन झालें ॥ धालें माझें मन भलें ॥ २ ॥
भलेंपण मज दिलें ॥ प्रेमलोट पाझरले ॥ ३ ॥
झरलें जें माझें अंग ॥ तव काजीं हो सुरंग ॥ ४ ॥
रंगला हा वासुदेव ॥ तव पदीं ठेवुनी भाव ॥ ५ ॥

---

## २३७ अभंग

भाव भक्ति अंगीं उठे ॥ प्रेमभरें कंठ दाटे ॥ १ ॥
दाटे प्रेमाश्रु लोचनीं ॥ रोम राहे उभारूनी ॥ २ ॥
उठोनियां आलिंगायां ॥ आतां जातां न ये पाया ॥ ३ ॥
पाया पडुनी स्तवूं जरी ॥ तरी शब्द नुमटे हरि ॥ ४ ॥
हरिलें त्वां देहभान ॥ आतां कोणा करूं नमन ॥ ५ ॥
मन दत्तरूप होता । वासुदेवी ये धन्यता ॥ ६ ॥

---

## २३८ अभंग

दत्ता ये धांवूनि धांवूनि । माझा धांवा परिसूनि ॥१॥
मनोरथावरि बैसूनि नेसोनि । दिग्वसनाते महामुनी ॥२॥
अंगीं विभूति चर्चूनि चर्चूनि । दंडकमंडलु घेऊनी ॥३॥
कृपाकटाक्षें पाहूनी सावरुनि । वासुदेवा करिं धरुनी ॥४॥

---

## २३९ अभंग

रुसलासी तुं कां दत्ता । तुजवरीं रुसतों आतां ॥१॥
हाक न कां ऐकिली माझी ॥ नायकें मी बोली तूझी ॥२॥
कां न पाहिलें मला । न पाहिन आतां तुला ॥३॥
कां उपेक्षिलें मला । आतां उपेक्षूं कीं तुला ॥४॥
वासुदेव रुसला दत्ता ॥ समजावी त्याच्या चित्ता ॥५॥

---

## २४० अभंग

तुं मी भिन्न न मानिसी । तरी एकी न कां करिसी ॥१॥
तुझें माझें पण आतां । मोडी जोडी ऐक्य दत्ता ॥२॥
स्वात्मधन घे हें माझें । स्वात्मयाथात्म्य दें तूझें ॥३॥
वासुदेव म्हणे दत्ता । पराभक्ति ती दे आतां ॥४॥

---

## २४१ अभंग

मित्र मित्र जरि भांडती । तरी पुनः एक होती ॥१॥
दंपतीचा हो कलह । लवमात्र न तुटे स्नेह ॥२॥
देवभक्ताचें भांडणें । परभक्तीचें तें ठाणें ॥३॥
वासु म्हणे हा विनोद । देतो दत्ता परानंद ॥४॥

---

## २४२ भजन

दिगंबरा दिगंबरा ॥ श्रीपादवल्लभ दिगंबरा ॥

---

# वारांचीं पदें व अभंग

## २४३ रविवार

पद—( चाल—मला शांति मुनि० ) ताल—झंपा

नमो ज्योतिरात्मन् नमो द्वादशात्मन् ॥ नमोऽस्त्वर्यमन्नंशुधामन् ॥ धृ० ॥ लोकनयनो भवान् शोकशमनो द्युमान् लोकदीपो महान् श्लोकभास्वान् ॥ लोककर्ताऽघहा लोकभर्ताऽकहा लोकहर्ता- ऽऽर्तिहा त्वं महात्मन् ॥ १ ॥ पोषणाद्योऽस्य पूषैकचारी यमः संयमात्सूर्य इह सूरिवेद्यः ॥ रश्मिरससंयमाद्वापि सवितार्यमा दर्शयतु मेऽयनं सोऽपि भास्वान् ॥ २ ॥ सर्वकर्माणि विद्वान्मदंगो द्युमन् वारयाग्ने नय स्वार्थभुज्यै ॥ स्वेन सुपथा कथान्यस्य मास्त्विव- तरथा मे गतिर्न च नमस्तेऽस्तु भूमन् ॥ ३ ॥

---

## २४४ अभंग

तेजे जाळी बळी तम ॥ अंशुमाळी तेजोधाम ॥ १ ॥
जो तनय कश्यपाचा ॥ सूर्यराजा जो द्विजांचा ॥ २ ॥
यदुदर्यी शंभू हात ॥ जोडी तया जोडूं हात ॥ ३ ॥
कर्मसाक्षी जो जग वीक्षी ॥ धर्म रक्षी भक्षी पापा ॥ ४ ॥
हिरण्मयपात्र झांकी ॥ सत्यमुख तें उघडी कीं ॥ ५ ॥
कल्याणतम तें रूप ॥ मग पाहूं आपोआप ॥ ६ ॥
पूषादेवि मंडवि जो तूं ॥ तो हा पुरुष मी जाण तूं ॥ ७ ॥

भजन

॥ जय जय भास्कर—पाहि दिवाकर ॥

## २४५ सोमवार

पद—( चाल-मला शांतमुनि ) ताल झंपा

नमस्ते पुरारे नमस्तेऽसुरारे ॥ नमस्ते स्मरारेऽघवैरे ॥ ध्रु० ॥ पंचवक्त्रो भवो यस्त्रिनेत्रो धवो हैमवत्याऽनवोऽमेयभावः ॥ सोम-सूर्याग्निदृक् सोमतिलकोऽतिदृक् सोमईशोऽसि स त्वं भवारे ॥ १ ॥ लोककर्ता विभुर्लोकहर्ता प्रभुर्लोकविपदंतको यो हि शंभुः ॥ स त्व-मज शंकरस्त्रीश्वरोऽभयकरः स्वाश्रिताभीष्टकर उग्रमूर्ते ॥ २ ॥ त्वं भिषक्तम इति श्रुतिगिरा मे मतिर्निश्चिता त्वां प्रति प्रार्थयंती ॥ यो हि भवरुजोऽनन्यलब्धौषधं देह्यबाधं नमस्ते भवारे ॥ ३ ॥ नमस्ते पुरारे० ॥

---

## २४६ अभंग

तव कोपा वंदूं रुद्रा । तव चापा वंदूं भद्रा ॥१॥
तव बाणा वंदूं भीमा । तव बाहू वंदूं सोमा ॥२॥
शिव होवो बाण तुझा । शिव होवो चाप तुझा ॥३॥
शरज्या शिव होवो ते । नित्य रक्षी यांही मतें ॥४॥
पापघ्नी शिव तनु तुझी । गिरिशा ती त्राती माझी ॥५॥
परिवारासह आम्हांते । रुद्र राखो शस्त्रहस्तें ॥६॥
तव महिमा वासुदेवा । वर्णवे कीं सदाशिवा ॥७॥

भजन

॥ शिवहर शंकर धूर्जटे-शिवहर शंकर धूर्जटे ॥

---

## २४७ मंगळवार

( पद—ताल-झंपा )

उदो देवि तुझा उदो देवि तुझा । असो गोंधळ पाहि माझा ॥ ध्रु० ॥ आदि माये तुवां हा प्रसाद दिला । निवृत्ति वधू आजि मजला । लाधली आजि बरा, हर्ष झाला खरा । घालुं गोंधळ आतां शीघ्र तूझा ॥ १ ॥ हा निगम संबळ वाजवुनि केवळ ॥ लोक मिळवुनियां येथ सबळ ॥ स्वात्मज्योति बरी दिवटी धरुनी करीं ॥ नाचूं थै थै पुढें आजि तूझ्या ॥ २ ॥ काममहिषाचिया बळिसि घेई, दयाब्धे ॥ तुझ्या वंदु ह्या देवि पाया ॥ आजिचा सुदिन हा मंगळचि होय हा । आली अंगीं महामाय माझ्या ॥ ३ ॥ धन्य हे माउली आजि मज पावली ॥ नवस घेउनि भली तृप्त झाली ॥ चिन्मयी ती कुलस्वामिनी केवळ ॥ वासुदेवा विमल बोध दे जी ॥४॥ उदो देवि तूझा० ॥

---

## २४८ अभंग

स्मरूं अंबिकेला महेशमहिला ॥ अवितर्क्यलीला मला पहा ॥ १ ॥
नमूं आदिमाये अये शंभुजाये ॥ त्वरें धांवत ये तूं ये वेळां ॥ २ ॥
कामक्रोध शुंभनिशुंभ माजले ॥ आम्हां गांजियेलें धावे पावे ॥ ३ ॥
लोभरक्तबीज संहारी तो आज ॥ न दिसे त्राता मज तुजवीण ॥ ४ ॥
चंडमुंड मदमत्सर हे खेद ॥ देती शिरच्छेद करो यांचा ॥ ५ ॥
अहंकार धूम्रनेत्र खाऊं आला ॥ मारी त्वरें याला मूलासहित ॥ ६ ॥
हाणी प्रतिपक्षी वासुदेवा रक्षी ॥ कृपेनें निरीक्षी साक्षीभूतें ॥ ७ ॥

भजन

॥ जयजय भगवति दुर्गेदेवी । मजवरी कृपादृष्टी ठेवी ॥

---

## २४९ बुधवार

पद–( चाल आतां रामपायीं मना ) झंपा

विदा संविदा ठान् त्रिशून्यानपि स्वान्। लाति गृह्णात्यवतु विठ्ठलोऽस्मान् ॥ ध्रु० ॥ यो हि भीमातटे संवसन्संकटे संस्मृतो वा न वा भक्तनिकटे ॥ यो हि तिष्ठति मुदा मोहितं स्वं सदा पाति पात्वंबुदाऽभोऽपि सोऽस्मान् ॥१॥ योऽनुकंपावसर ईक्षते नो परः पौरुषं वा धनं वा स्वरूपं ॥ यो वयोजातिविद्यासदाचारविन्मुखमपि यः स पात्वेष सोऽस्मान् ॥ २ ॥ पुत्रपुष्पादिभिस्तुष्यते योऽबुभिर्भक्तदत्तैः स्वयं श्रीपतिः सन् ॥ सूर्य इव दीपकैः सिंधुरिव चोदकैः स्वल्पकैरवतु सोऽत्रापि चास्मान् ॥ ३ ॥ यो निजानुग्रहान् प्रेतपशुविग्रहान् वहति निःशंकमस्तग्रहो हि ॥ हीनगेहे सदा दीनगेहे मुदाऽकृत्यमपि चाकरोत्पातु सोऽस्मान् ॥ ४ ॥ योऽकरोगार्तिहा योऽकरोदशुभहा दलनमपि पद्महस्तेन जन्याः ॥ भक्तभयभंजनो मुक्तजनरंजनो वासुदेवः सदा पातु चास्मान् ॥ ५ ॥

---

## २५० अभंग

पुंडलीकवर उभा विटेवर। नित्य कटीवर कर ठेवूनी ॥ १ ॥ भिवरेचे तीरीं विख्यात पंढरी। नादब्रह्म वरी वरिष्ठा जी ॥ २ ॥ त्या माजी विठ्ठल राहे जो निश्चल। चिन्मय केवळ काळकाळ ॥ ३ ॥ चंद्रभागेजवळ राउळ विशाळ। तेथें घननीळ निर्मल जो ॥ ४ ॥ राई रखुमाबाई ज्याच्या पार्श्वभागीं ॥ पाहतां वीतरागी भोगी हो कां ॥ ५ ॥ कटी बरोबर हा भव सागर। दावी भक्तोद्धार वासु म्हणे ॥ ६ ॥

भजन

पंढरीनाथ पंढरीनाथ। आम्हीं अपराधी घ्या पदरांत ॥

## २५१ गुरुवार

पद–( चाल मला शांत मुनि ) ताल झंपा

नरा दत्तगुरु हें परब्रह्म आहे। होइ जागृत उगा फससि मोहे ॥ ध्रु० ॥ दत्तगुरु मन्मनीं दत्तगुरु लोचनीं। दत्तगुरु यद्वचनिं भरुनि कानीं। दत्तगुरु बाहेरीं दत्तगुरु अंतरीं दत्त सर्वांतरी भरुनि राहे॥ १॥ ब्रह्म हा दत्तगुरु विष्णु हा दत्तगुरु रुद्र हा दत्तगुरु सत्य आहे दत्तगुरु तारक दत्तगुरु कारक ॥ शक्तिधर लोकसाक्षीच आहे ॥ २ ॥ दत्तगुरु वांचुनी किमपि नाहीं जनीं। दत्तगुरु वाचुनी सुरहि नोहे। दत्तगुरुवांचुनी काय फल वाचुनी। जाय फळ सोडुनी भोगिता हें ॥ ३॥ माय फळ पाजिते काय फळ होय तें। जाय फळ पुण्य तें भोग नासें। मोहफळ दे त्यजुनि नाही फळ याहुनी। म्हणुनि तूं दत्तगुरु पाद पाहे॥ ४ ॥ भोग खोटा नको यागताठा नको। योगताठा नको धरुं विमोहें। दत्तगुरुवांचुनी चित्त न धरीं जनी। दत्तगुरु घे मनीं भरुनि स्नेहे॥ ५ ॥ या युगी साधनें वाउगी गुरुविणें। ना उगी तुं शिणें शास्त्रमोहें। दत्तगुरु देव हा दत्तगुरु तारि हा। स्वानुभवें वासुदेवचि वदे हें ॥ ६ ॥

---

## २५२ अभंग

गणेश गकार हुताश रकार। लक्ष्मीश उकार गुरुदत्त ॥१॥ अविद्या गुकार तन्नाशक रुकार। गुरुदत्त परपार दाता ॥ २ ॥ गुरुदत्त माता गुरुदत्त पिता। तोचि भयहर्ता त्राता माझा ॥३॥ गुरुपादपाथ तेंचि माझें तीर्थ। गुरुदेव समर्थ स्वार्थदाता ॥ ४॥ गुरुदत्त नाम तेंचि पुण्यधाम। जें घेतां कुकर्म होम करी ॥ ५ ॥ गुरुदत्तसेवा परिहारी भवा। संसाराब्धिनावा भावार्थिया ॥६॥ वासुदेव म्हणे येणें कोण शीणें। गुरुविणें जीणें भेणें तेंचि ॥ ७ ॥

भजन

॥ पावना दत्ता–पतीत पावना दत्ता ॥

## २५३ शुक्रवार

पद--( चाल-मला शांतमुनि० ) ताल-झंपा

नमः सिंधुकन्ये नमः सर्वमान्ये । नमो विष्णुमान्ये वदान्ये ॥ध्रु०॥ लक्ष्मि पद्मालये विष्णुवत्सालये लोकमातर्नमो विश्वनिलये । क्षीरसागर-सुते ते नमः सुरनुते वेदगणसंस्तुते विश्वमान्ये ॥ १ ॥ यत्कृपासत्क-टाक्षोपलब्धोत्कटाः संपदो लेभिरे शक्रमुख्याः । भोगमोक्षप्रदे भक्तजन-कामदे सर्वदे सर्वदा पाहि मान्ये ॥ २ ॥ मस्तके या लिपिः केन लिखिता ह्यपि त्वं तदंतर्मुहुर्लिखसि साऽपि ॥ ब्रह्मणा वार्यते नैव तद्धार्यते यद्वचो मस्तके नैव धन्ये ॥ ३ ॥ भार्गवि त्वं सदा भार्गवाहे मुदा पर्यटसि कामदे त्वं हि वरदा ॥ वासुदेवप्रिये ते नमोऽतींद्रिये वासुदेवेष्टदे सिंधुकन्ये ॥ ४ ॥

---

## २५४ पद—चाल अभंगाची

जय जगदंबिके क्षीरनिधिकन्यके ॥ विश्वोद्भवकारके निजजन-तारके ॥ ध्रु० ॥ अये पद्मालये शुभे तूं ये विष्णुवल्लभे ॥ भार्गवि वारी भक्तक्षोभे पाहि मला स्वर्णभे ॥ १ ॥ पाप्यांमध्यें जरि मी थोर दयाळु तूं सुंदर ॥ दयनीय मजहुनी येर नसे सर्व दूर ॥ २ ॥ तूं कां ऐसा उपजविला लाज न ये कीं तुला ॥ अजुनि तरी दया तुला येवो पाहुनी मला ॥ ३ ॥ रोगराई नसता जरी कोय ये वैद्याघरीं ॥ जाणुनि हें तूं अंतरीं वासुदेवा तारीं ॥ ४ ॥

### भजन

जय जय कमले ॥ लक्ष्मी विमले ॥

---

## २५५ शनिवार

पद–( चाल-मला शांनमुनि ) ताल झंपा

नमो वज्रमूर्ते नमो रुद्रमूर्ते ।। तेऽस्तु कीशाऽऽकृते नष्टजूर्ते ॥ध्रृ०॥ अंजनीगर्भजो योऽभवद्वायुजो यो हि रुद्रांशजो दुष्टहंता ॥ जानकी-शोकहृत् रामचंद्राकहृत् स त्वमस्मानवाघोरमूर्ते ॥ १ ॥ पिप्पलाद-स्मृतेरिव तदा यत्स्मृतेः सार्धसप्ताद्रूपूर्वार्किभीतेः ।। भवति नाशो यथा नारसिंहस्तथा दुष्टविध्वंसकोऽस्युग्रमूर्ते ।। २ ।। नमो० ॥

---

## २५६ अभंग

अंजनीच्या सुता ये बा हनुमंता ॥ त्वरें वातजाता जाताल्हादा ॥ ध्रृ० ॥ नादा परिसुनी ज्याच्या धाकें मनीं राक्षस भिऊनी वर्णा जाती ॥ २ ।। जाती बुभुःकारें त्वरें भूत सारे ॥ तें रूप गोजिरें बरें दावी ॥ ३ ।। दावि क्रूरां भय तें रूप अभय ॥ चित्तीं असो ध्येय तें यशस्वी ॥ ४ ॥ यशस्वी जो रामदूत बलधाम ।। मुखीं वदे राम राम नित्य ।। ५ ॥ नित्य सीताशोकहारक विवेक ॥ युत वाततोक दुःख वारो ।। ६ ।।

---

## २५७ अभंग

भवाटवीमध्यें स्वानुभूति सीता ।। घेउनी अटतां आत्माराम ॥ १ ॥ विषयमृगतृष्णा भूल घाली जेव्हां ।। वाव मिळे तेव्हां कपटीया ॥ २ ॥ राजसाहंकारें स्वानुभूति सीता ।। नेली हनुमंता आतां धांवे ।। ३ ।। भवाब्धि लंघोनी लिंगदेह लंका ॥ जाळी तूं विवेका एक्या हाके ।। ४ ॥ साधनशिळेनें तूं सेतु बांधून ।। आत्मा-रामा घेऊन युद्ध करी ।। ५ ॥ कामादि असुर मारूनि दे आतां ।। स्वानुभूति सीता वासुदेवा ।। ६ ।।

भजन

अंजनिसुता जय हनुमंता–दर्शन दे तव राघवदूता

---

संतमहिमा

## २५८ अभंग

सदा संतांपाशीं जावें ॥ त्यांचे जवळीं बैसावें ॥ १ ॥
उपदेश ते न देती ॥ तरी ऐकाव्या त्या गोष्टी ॥ २ ॥
तेचि उपदेश होती ॥ त्याही कष्ट नष्ट होती ॥ ३ ॥
वासुदेव म्हणे संत ॥ संगे करिती पसंत ॥ ४ ॥

भजन

जय जय गुरु महाराज गुरु—जय जय परब्रह्म सद्गुरु ॥

---

## २५९ पद – चाल अभंगाची

दत्ता मजला प्रसन्न होसी जरि तूं वर देसी ॥ तरि मी आन न मागें तुजसी निर्धारुनि मानसी ॥ ध्रु० ॥ स्मरण तुझें मज नित्य असावें तव गुण भावें गावे ॥ अनासक्तिनें मी वागावें ऐसें मन वळवावें ॥ १ ॥ सर्व इंद्रियें आणि मन हें तुझे हातीं आहे ॥ यास्तव आतां तूं लवलाहें स्वपदीं मन रमवावें ॥ २ ॥ विवेक आणि सत्संगति हे नेत्रद्वय बा आहे ॥ वासुदेवा निर्मल देहें जेणें त्वत्पदिं राहे ॥ ३ ॥ दत्ता मजला प्रसन्न होसी० ॥

होचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥ १ ॥
गुण गाईन आवडी । हेचि माझी सर्व जोडी ॥ २ ॥
न लगे मुक्ति धनसंपदा । संतसंग देई सदा ॥ ३ ॥
तुका म्हणे गर्भवासी । सुखें घालावें आम्हासीं ॥ ४ ॥

---

आरत्या

1. करितों प्रेमें तुज नीरांजन० ( नं. १८४ )
2. आरती दत्तात्रेया० ( नं. १८६ )
3. आराते करुं भवदवदव० ( नं. १८५ )

---

## २६० आरती श्रीवासुदेवानंदसरस्वतींची

जय जय श्रीमद्गुरुवर स्वामिन् परमात्मन् हंसा । वासुदेवानंद-सरस्वति आरति तदहंसा ॥ ध्रु० ॥ सोहं हंसः पक्षाभ्यां संचरसि ह्याकाशे । वासस्ते खलु लोके सत्ये क्रीडा तव मानसे ॥ १ ॥ मुक्ता-हारो ब्रह्मवाहको वैराड्रूपधर । भक्तराजहृद्ध्वांततमोहृत् स्वीकुरु मांच हर ॥ २ ॥ पक्षस्यैके वातेनैते भीताः काकाद्याः । पलायितास्ते द्रुतं प्रभावाद्भवन्ति चादृश्याः ॥ ३ ॥ एवं सति खलु बालस्तेऽहं ग्रसितः कामाद्यै-। र्मातस्त्वरया चोद्धर कृपया प्रेषितशांत्याद्यैः ॥ ४ ॥ दासस्ते नरसिंहसरस्वति याचे श्रीचरणम् । भक्तिश्रद्धे वासस्ते हृदि सततं मे शरणम् ॥ ५ ॥

---

## २६१ आरतीनंतर श्रीगुरुस्तोत्र

नमः श्रीगुरो मेशधीशे दयाब्धे । भयार्तिघ्नते स्वात्मदो वासुदेव । यतींद्रसेवितानंदपादाब्जयुग्मं । सदा मे हृदि स्थास्नुतां यातु देव ॥ १ ॥ भक्तिश्रद्धे देहि मे ते दयालो दासो दीनो भावतापेन तप्तः । सर्वैस्त्यक्तो द्वारि तेऽत्र प्रसंस्थोऽहं मां मातः पालयाद्य स्वबालम् ॥ २ ॥ आलोक्य मामच्युत ईश्वरोऽपि । भीतोऽगमत्सागरमूरशैलान् । सत्यं तथा च तव हृत्कमले स्थितो यः । श्रांतः स्व दर्शय यते गुरु-वासुदेव ॥ ३ ॥ मा भीरिति वचनं मे देहि दयालो गुरो यतिश्रेष्ठ ।

मान्यो मे रक्षार्थं धावति भोः श्रीगुरो जगन्मातः ॥ ४ ॥ त्वयि भक्तिं मे वर्धय दुर्वृत्तम ईश नाशय अशेषं । यच्च तवेष्टं तत्कुरु मयि भोः सर्वज्ञ वक्तुमसमर्थः ॥ ५ ॥ भक्तिं च मे वर्धय भोस्त्वदीये । रूपे तथा नाशय वृत्तमश्च । दुर्वासनाश्च गुरुवर्य दयानिधे ते । यच्चेष्टमेव कुरु तन्मयि सार्वभिज्ञ ॥ ६ ॥ मा भीश्च भोस्तेऽस्त्वभयं सदैव । याचेऽहमेतद्वचनं गुरो ते । अज्ञोऽहमीश करुणाघन वासुदेव । रक्षस्व मां सर्वत एव सर्वदा ॥ ७ ॥ प्रसीद मे सागस आर्तबंधो । कारुण्य-सिंधोनुपमास्तबंधो । बंधो मृषापि व्यथयत्ययं मां । स्वप्नोपमं छिंद्ध्यव सर्वतो माम् ॥ ८ ॥

---

## २६२ श्रीगुरुस्तोत्रम्

भावें नमूं श्रीगुरुच्या पदासी । जे आपदासी हरि दे पदांसी ॥ दासीपरी श्री नमि ज्या पदांसी । यासी भजे तो नमितों पदासी ॥१॥ सततविगतगम्य श्रेष्ठ दुष्टां अगम्य । सदयहृदयलभ्य प्रार्थिती ज्यासि सभ्य ॥ समद विमद होती यत्प्रसादें न हो ती । कुगति सुगति देती त्या पदा हे विनंती ॥ २ ॥ गुरुपदा विपदापहरा सदा । अभयदा भयदामयदारदा ॥ हृतवदान्यमदा तव दास्य दे ॥ अमददा गदहा न कुदास्य दे ॥ ३ ॥ नमस्ते भवारे नमस्ते शतारे । नमस्तेऽघवैरे प्रशस्तेष्टकर्त्रे ॥ नमस्ते खलारे विहस्तेष्टदात्रे । नमस्तेऽरिवैरे समस्तेष्टसत्रे ॥ ४ ॥ गुरुपद मद वारी सर्व भेदां निवारी । गुरुपद गद वारी सर्व खेदां निवारी । सतत विनत होतां वारि जें आपदांसी । सतत विनत होऊं आम्हीं ही त्या पदांसी ॥ ५ ॥ भावें पठति जे लोक हें गुरुस्तोत्रपंचक ॥ तयां होय ज्ञान बरें वासुदेव म्हणे त्वरें ॥६॥

इति श्री० प० प० श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचितं
श्रीगुरुस्तोत्रपंचकं संपूर्णम् ॥

---

## २६३ श्रीगुरुदत्तात्रेयाष्टकम्

तापत्रयानें मम देह तापला। विश्रांति कोणी न च देतसे मला ॥ दैवें तुझें हें पद लाधलें मला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला ॥ १ ॥ कामादि षड्वैरि सदैव पीडिती। दुर्वासना अंग सदैव ताडिती ॥ त्राता दुजा कोण न भेटला मला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला ॥ २ ॥ देहीं अहंता जडली न मोडवे। गृहात्मजस्त्रीममता न सोडवे ॥ त्रितापदावानळ पोळितो मला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला ॥ ३ ॥ अंगीं उठे हा अविचार दुर्धर। तो आमुचें हें बुडवीतसे घर ॥ पापें करोनी जळतों त्वरें मला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला ॥ ४ ॥ तूंची कृपासागर मायबाप तूं। तूं विश्वहेतू हरि पाप-ताप तूं ॥ न तूजवांचूनि दयाळु पाहिला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला ॥ ५ ॥ दारिद्र्यदावें द्विज पोळतां तया। श्री द्यावया तोडिसि वेल चिन्मया ॥ तया परी पाहि दयार्द्र तूं मला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला ॥ ६ ॥ प्रेतासि तूं वाचविसी दयाघना। काष्ठासि तूं पल्लव आणिसी मना ॥ हें आठवी मी, तारि जीव कोमला। दत्ता कृपा-साउलि दे नमूं तुला ॥ ७ ॥ ह्या अष्टकें जे स्तविती तयावरी। कृपा करीं हात धरीं तया शिरीं ॥ साष्टांग घालूं प्रणिपात बा तुला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला ॥ ८ ॥

इति० श्री० प० प० श्री० वा० स०विरचितं
श्रीगुरुदत्तात्रेयाष्टकं संपूर्णम् ॥

---

## २६४ करुणात्रिपदी–( उद्धवा शांतवन कर० )

शांत हो श्रीगुरुदत्ता मम चित्ता शमवी आतां ॥ ध्रु० ॥ तूं केवळ माता जनिता, सर्वथा तूं हितकर्ता ॥ तूं आप्त स्वजन भ्राता, सर्वथा

तूंची त्राता ॥ चाल ॥ भयकर्ता तूं भयहर्ता ॥ दंडधर्ता तूं परिपाता॥ तुजवांचुनि न दुजी वार्ता ॥ तूं आर्तां आश्रय दत्ता ॥ शांत हो०॥१॥ अपराधास्तव गुरुनाथा, जरि दंडा धरिसि यथार्था ॥ तरि आम्हीं गाउनि गाथा, तव चरणीं नमवूं माथा ॥ चाल ॥ तूं तथापि दंडिसि देवा ॥ कोणाचा मग करूं धावा ॥ सोडविता दुसरा तेव्हां । कोण दत्ता आम्हां त्राता ॥ शांत० ॥ २ ॥ तूं नटसा होउनि कोपी, दंडितां-हि आम्ही पापी ॥ पुनरपिही चुकत तथापी, आम्हांवरि न च संतापी ॥ चाल ॥ नच्छतः स्खलनं क्वापी ॥ असें मानुनि नच हो कोपी ॥ निजकृपालेशा ओपी ॥ आम्हांवरि तूं भगवंता ॥ शांत० ॥ ३ ॥ तव पदरीं असतां ताता, आडमार्गीं पाउल पडतां ॥ सांभाळुनि मार्गावरता, आणिता न दुजा त्राता ॥ चाल ॥ निज बिरुदा आणुनि चित्ता ॥ तूं पतीतपावन दत्ता ॥ वळे आतां आम्हांवरता ॥ करुणाघन तूं गुरुनाथा ॥ शांत हो० ॥ ४ ॥ सहकुटुंब सहपरिवार, दास आम्ही हें घरदार ॥ तव पदीं अर्पुं असार, संसाराहित हा भार ॥ चाल ॥ परिहारिसी करुणासिंधो ॥ तूं दीनानाथ सुबंधो ॥ आम्हां अघलेश न बाधो ॥ वासुदेव प्रार्थित दत्ता ॥ शांत हो श्रीगुरुदत्ता० ॥ ५ ॥

---

## २६५ पद–( चाल-इस तनधनकी० )

श्रीगुरुदत्ता जय भगवंता ॥ तें मन निष्ठुर न करी आतां ॥ ध्रु० ॥ चोरें द्विजासी मारितां मन जें, कळवळलें तें कळवळो आतां ॥ १ ॥ पोटशुळानें द्विज तडफडतां, कळवळलें तें कळवळो आतां ॥ २ ॥ द्विजसुत मरतां वळलें तें मन, होकीं उदासिन न वळे आतां ॥३॥ सतिपति मरतां काकुळति येतां, वळलें तें मन न वळे कीं आतां ॥ ४ ॥ श्रीगुरुदत्ता त्यजि निष्ठुरता, कोमलचित्ता वळवीं आतां ॥ ५ ॥

## २६६ पद

जय करुणाघन निजजनजीवन, अनसूयानंदन पाहि जनार्दन ॥ ध्रु० ॥ निज अपराधें उपराठी दृष्टी, होउनि पोटीं भय धरूं पावन ॥ १ ॥ तूं करुणाकर कधीं आम्हांवर, रुससी न किंकरवरद कृपाघन ॥२॥ वारी अपराध तूं मायबाप, तव मनीं कोपलेश न वामन ॥ ३ ॥ बालकापराधा गणे जरि माता, तरि कोण त्राता देईल जीवन ॥ ४ ॥ प्रार्थी वासुदेव पदीं ठेवी भाव, पदीं देवो ठाव देव अत्रिनंदन ॥ ५ ॥ जय० ॥

---

## २६७ पद

आठविं चित्ता तूं गुरुदत्ता ॥ जो भवसागरपतितां त्राता ॥ आहे जयाचें कोमल हृदय ॥ सदयचि हा भव हरि वरदाता ॥ १ ॥ पाप पदोपदिं होई जरी तरी ॥ स्मरतां तारी भाविकपाता ॥ २ ॥ संकट येतां जो निज अंतरीं ॥ चिंती तया शिरीं कर धरी त्राता ॥ ३ ॥ जो निज जीवींचें हितगुज साचें ॥ ध्यान योगियाचें तो हा ध्याता ॥४॥ सज्जनजीवन अनसूयानंदन ॥ वासुदेव ध्यान हा यतिभर्ता ॥ ५ ॥

---

## २६८ स्फुट अभंग

देवदेवा दत्ता तव पदीं चित्ता । ठरवीं विश्वनाथा कथा गातां ॥१॥
माझी वाणी गूण तुझे वाखाणून । रमो हेंहि धन दान देगा ॥ २ ॥
तुझ्या भजकाची सेवा करो कर । हाचि देयीं वर वरदेशा ॥ ३ ॥
मन द्रवो माझें गूण गातां तूझे । उतरे कर्मओझें माझें जेणें ॥ ४ ॥
सकंप रोमांच अंगीं व्हावे उंच । न दिसावें उंचनीच कोठें ॥ ५ ॥
जेवीं श्येन जाळें तोडूनियां पळे । तसें भवजाळें (बळें) तोडवीं हें ॥६॥
आतां माझा भाव तव पदीं ठाव । घेवो हें वैभव नित्य असो ॥ ७ ॥

## २६९ अभंग

द्वेषीना कोणातें मैत्रीनें सर्वांतें । समरस वर्ते संत तोचि ॥ १ ॥
ममता अहंता सोडी लोकांवर । कृपा करी धीर धरी क्षमा ॥ २ ॥
दैवलाभें हारिख सम सुखदुःख । मानी तोचि चोख दत्तभक्त ॥ ३ ॥
उदासीन दक्ष शुची अनपेक्ष । शत्रुमित्रपक्ष न लक्षी जो ॥ ४ ॥
हर्षामर्षभीती न ठेवी जो चित्तीं । उदासीनवृत्ति राखी नित्य ॥ ५ ॥
मान अपमान देई जो सोडून । तोचि साधू पूर्ण दत्तभक्त ॥ ६ ॥
वासुदेव म्हणे स्थितप्रज्ञ भक्त । तोचि गुणातीत ब्राह्मण तो ॥ ७ ॥

## २७० अभंग

अति सुलभ दत्तनाम । न पडे ज्या किमपि दाम ॥ १ ॥
निज जिह्वा ही साधन । नाम घेतां नोहे दीन ॥ २ ॥
दत्त दत्त उच्चारितां । दत्त भेटे भोळ्या भक्तां ॥ ३ ॥
माहात्म्य दत्तनामाचें । हो अगम्य वेदवाचे ॥ ४ ॥
वासुदेव म्हणे दत्त- । नामें भक्त होती मुक्त ॥ ५ ॥

## २७१ अभंग

सर्व पापां प्रायश्चित्त । चित्तगेहीं ध्यावा दत्त ॥ १ ॥
कर्णमार्गें दत्तगुण । रिघतां हो मन पावन ॥ २ ॥
स्मरतांचि दत्तरूप । लया जाती पापताप ॥ ३ ॥
वाचे वदतां दत्त दत्त । दत्त करी गुणातीत ॥ ४ ॥
वासुदेव म्हणे चित्ता । आदरीं तूं भावें दत्ता ॥ ५ ॥

## २७२ अभंग

देवांचा जो देव ख्यात महादेव। श्रुतीचें वैभव भववैरी ॥ १ ॥
वैरी असुरांचा कैवारी सुरांचा। संसारी नरांचा जो आधार ॥ २ ॥
धारण धर्माचा पति पार्वतीचा। सद्गति संतांचा साचा देव ॥ ३ ॥
देवऋषिमुनींचा संशय हराया। प्रार्थिती हरा या राया म्हणुनी ॥४॥
म्हणुनी दक्षिणामूर्ती अवतार। धरी गौरीवर वरद हो ॥ ५ ॥
हो परमहंस परिव्राडाचार्य। पूज्य सुरवर्य आर्यवंद्य ॥ ६ ॥
वंद्य दत्तात्रया परी वासुदेवा। देवोनि सद्भावा भावा वारो ॥ ७ ॥

---

## २७३ खंडोबाचा अभंग

देव खंडेराव महालसाधव। जेजोरीचा देव भावलभ्य ॥ १ ॥
लभ्य नसें योगा तो हा भक्तियोगा। गम्य घे अभंगा अंगा देव ॥२॥
देव दुःखहारी मणिमल्लारी। निजभक्तां तारी वारी क्लेश ॥ ३ ॥
महालसाकांत हर मूर्तिमंत। खंडोबा महंत ख्यात देवीं ॥ ४ ॥

---

## २७४ अभंग

चिमणी रमणी हृदयहारिणी। तरुणी हरिणी दत्तमूर्ती ॥ १ ॥
रक्त पादतळ बाहु दोन सरळ। वक्षःस्थळ भाळ सुविशाळ ॥ २ ॥
विस्तीर्ण जघन सुहास्य वदन। श्वेतालपरदन पीनश्रोणी ॥ ३ ॥
शोभे सिद्धासन खेचरी मंडन। वराभयदान दे दों करीं ॥ ४ ॥
ऐसें दत्तध्यान हृदयीं धरून। आरंभा भजन आवडीनें ॥ ५ ॥

---

## २७५ अभंग

नाम घेतांचि तात्काळ । पळताति कळिकाळ ।। १ ।। मग बापुडा वेताळ । भूत नोहे कां व्याकूळ ।। २ ।। नाम ऐकी खळव्याळ । तो ही सांडी स्वामंगळ ।। ३ ।। ब्रह्मनिष्ठ घोटी लाळ । नाम ऐकतां रसाळ ।। ४ ।। दत्तनाम थोडा वेळ । गातां तुटे भवजाळ ।। ५ ।।

---

## २७६ उपदेशपर अभंग (पत्र)

गं गा पाप वारी शशी ताप हरी ।
गा ढ दैन्य वारी कल्पवृक्ष ।। १ ।।
भा ग्यें सद्गुरूचें झालिया दर्शन ।
गी ळे दैन्यवनं पाप ताप ।। २ ।।
र ज तम दोष वारुनीयां मन ।
थी रवुनी ध्यान करी जो नित्य ।। ३ ।।
अं तरीं तयाच्या प्रगटे महेश ।
बु द्धीचा जो ईश तोची गुरु ।। ४ ।।
स द्गुरु तो देव भासे स्वयमेव ।
ना ना देहीं गम्य भाव एक ।। ५ ।।
रा बती जयाच्या सत्तेनें करणें ।
य श त्याचें गाणें गावें नित्य ।। ६ ।।
णा न्त रायमध्य नादि नाम त्याचें ।
घेतां संसाराचें भस्म होय ।। ७ ।।
तोची साक्षिभूत गुरु वासुदेव ।
तया पदीं भाव ठेवा नित्य ।। ८ ।।

---

## २७७ अभंग

भवसिंधुमाजीं पडलीं मी आतां । काढीं वर ताता हात धरुनि ॥ १ ॥
धरुनियां कर तूंच कृपा कर । काढीं मज वर दरहरा ॥ २ ॥
हरावया कष्ट मुलिचे गुरुबाप । मग आपोआप धांवे त्वरें ॥ ३ ॥
त्वरें धावूनियां आलि गुरुमाय । मुलीचा अपाय हरावया ॥ ४ ॥
कां ग बोरळसी काय झालें तूज । त्वां उगीच आज गांजविलें ॥ ५ ॥
झाडावर नर चढुनियां खालीं । पाहुनी आपूली पडछाया ॥ ६ ॥
पडलों प्रवाहीं बुडतों मी आतां । धांवा हो वरता काढा म्हणे ॥ ७ ॥
तेणें परि तूझें असे हें वचन । व्यर्थ तूं भुलून बोभाटसी ॥ ८ ॥
बुद्धिसिंधुमाजीं निज प्रतिबिंब । पाहुनीयां क्षोभ पावलीस ॥ ९ ॥
मी ही उपजली एवढी वाढली । बळकट झाली प्रौढ आतां ॥ १० ॥
आतां मी भागली आतां वृद्ध झाली । आता मी रोडली झाली दीन ॥ ११ ॥
माझा परिवार हा हें माझें घंर । पडलें अंतर जिवलग्याचें ॥ १२ ॥
सर्व लटिकेंचि भासतसे मोहें । आतां चित्तिं घे हें माझें वाक्य ॥ १३ ॥
पूर्वी अहंकार निजरूपावर । कल्पिला तो घोर दर दावी ॥ १४ ॥
आपुलें तादात्म्य ह्या अहंकाराशीं । त्यामुळें देहाशीं यावत्कर्म ॥ १५ ॥
जीवाशीं तादात्म्य सहज असे हें । जन्मोजन्मीं राहे नोहे नष्ट ॥ १६ ॥
साक्षी आत्मयासी तादात्म्य भ्रमानें । नासे तेंची ज्ञानें गुरुकृपे ॥ १७ ॥
झाडावर मी हा न पडलों जळीं । जाणे तये वेळीं भ्रम सोडी ॥ १८ ॥
तेंवीं गुरुवाक्या परिसुनि साक्षी । मी असें निरीक्षीं अंतर्दृष्टी ॥ १९ ॥
असें तूं आपणा आपण जाणून । भ्रम निरसून होयीं मुक्त ॥ २० ॥
वासुदेव म्हणे माझा हा विमल । मनिं धरिं बोल फोल नोहे ॥ २१ ॥

---

## २७८ अभंग

भयाचें जें भय भक्तां दे अभय। ते हे दत्तात्रेयपाय वंद्य ॥ १ ॥
भासे जें द्वितीय तेंचि दावि भय। म्हणुनी हे पाय ध्यावे चित्तीं ॥ २ ॥
मुळीं नसें द्वय तेथें कैंचे भय। बाळा जेवीं द्वय भासे छाया ॥ ३ ॥
पाहुनी सावुली बाळक आपुली। भी तसी ही बोली हो मायिक॥४॥
अंतर्दृष्टीनें हें दत्तपद ध्यातां। भयाची न वार्ता काळत्रयीं ॥ ५ ॥
वासुदेव म्हणे स्वाभिन्न हें पद। ध्यातां भय खेद भेद कैंचा ॥ ६ ॥

---

## २७९ अभंग

पुरे करताल प्रेम दीपमाळ। फावे तोचि काळ भजनाचा ॥ १ ॥
लाधे जें जें स्थळ तें शुद्ध देऊळ। फावे तोचि काळ भजनाचा ॥ २ ॥
कसा असो स्वन तोचि हो सवन। ये तो श्रोता जन भजनाचा ॥ ३ ॥
जेव्हां जें स्मरण तोचि क्रम जाण। भजनीं सर्वां पूर्ण अधिकार॥ ४ ॥
दत्तनामें सांग होताहे जें व्यंग। संशय कां मग भजनीं ध्यावा ॥ ५ ॥
भजनीं आड माता पिता येतां त्यांतें। त्यजुनी परतें दत्ता भजा ॥ ६ ॥

---

## २८० अभंग

वेदें तुझा ठाव दाविला न वाव। लपाया तूं देव लपसी कैसा ॥ १ ॥
कैसा तरी लप आतां न घें झोप। विवेकें तद्रूपद्वय शोधूं ॥ २ ॥
शोधूं पापपुण्य सगुण वरेण्य। ध्यावूं रूप अरण्य न सेवितां ॥ ३ ॥
न सेवितां योग भजनीं आणूं रंग। नको सुर राग टाळ आतां ॥ ४ ॥
आतां वाक्यें कोश शोधूं तोडूं पाश। निर्गुणीं निराश होउनी राहूं॥ ५ ॥

---

## २८१ अभंग

मोक्षाचें आम्हांसी नाहीं अवघड । तो आहे उघड गाठोडीसी ॥ १ ॥
त्यासी त्यास देणें कोण तें उचित । मानूनियां हित घेतों सुख ॥ २ ॥
भक्ताचे सोहाळे होतील जीवासी । नवल तेवीं मी पूरविता ॥ ३ ॥
वासुदेव म्हणे सुखें देई तो संसार । आवडीसी थार करी माझे ॥४॥

## २८२ अभंग

आजि आनंद आनंद । मनीं भरला पूर्णानंद ॥ १ ॥
वाचे बोलतां तो नये । बुद्धिबोध स्तब्ध राहे ॥ २ ॥
नित्यानंद सद्‌गुरुरूपा । पाहतां हरल्या जन्मखेपा ॥ ३ ॥
तया माझा नमस्कार । जेणें हरलों आपपर ॥ ४ ॥
ते हे वासुदेवचरण । हृदयीं येतां झालों धन्य ॥ ५ ॥

## २८३ अभंग

जीवस्वरूपा पाहतां । मोक्षसुख आलें हाता ॥ १ ॥
सत्यज्ञानानंद तया । श्रुति गर्जताती जया ॥ २ ॥
ऐसा श्रीगुरु उपदेश । होतां तुटती सर्व पाश ॥ ३ ॥
तो हा अनुभव खासा । पुसा वासुदेवदासा ॥ ४ ॥

## २८४ अभंग

भूपा स्वप्नीं जरी दिसे दरिद्रता। तीची जागा होतां वार्ता नसे ॥ १ ॥
स्वप्नीं महापाप होई त्याचा ताप । न करी नर झोंप लोपतांचि ॥२॥
जागेपणीं तसें जें जें घडतसे । ज्ञानोत्तर कसें वसेल तें ॥ ३ ॥
अपरोक्षज्ञान होतां पाप नाशे । वासुदेव असें सांगतसे ॥ ४ ॥

## २८५ अभंग

मनइंद्रियाचा चालक भासक। तोचि आत्मा एक प्रेरक जो ॥ १ ॥
ज्यावीण कांहीं क्रिया होत नाहीं। तयाचे नघाही मोही नर ॥ २ ॥
आपुल्यावरी घे कर्तृत्व भोक्तृत्व। सोडी खरें तत्त्व पामर जो ॥ ३ ॥
आत्मायाची चोरी तोचि नर करी। या परी दुसरी चोरी नसे ॥४॥
वासुदेव म्हणे आत्मापहारक। तो सर्व पातक शिरीं घेयी ॥ ५ ॥

---

## २८६ अभंग

तुज नमूं देवा ठेऊनीयां भावा। केला हा बरवा उपदेश ॥ १ ॥
मोहतम गेले ताप ही निमाले। त्वद्रूपीं निवालें माझें मन ॥ २ ॥
ज्ञानसूर्य मनीं उदित होवोनी। टांकिलें जाळूनि अंतस्तमा ॥ ३ ॥
देवा तुझें पद पाहूनि आनंद। झाला गेला खेद भेद सर्व ॥ ४ ॥
आज हें अपूर्व आलें मोठें पर्व। पाहिलें पद सर्व प्रेमास्पद ॥ ५ ॥
तूंचि मायबाप शमविले ताप। घालविलें पाप कोपद्वेषा ॥ ६ ॥
केला उपदेश माझा सर्व काम। करिसी निष्काम धाम दिल्हें ॥ ७ ॥
देवा परानंद सतत हें पद। दिसो हाचि छंद पुरवीं तूं ॥ ८ ॥

---

## २८७ अभंग

भलत्या मिषेंही दत्तनाम घेतां। फल येई हातां सत्य सत्य ॥ १ ॥
श्रुती स्मृती गाती पुराणें वदती। दत्तनामकीर्ती साधु संत ॥ २ ॥
तीर्थ प्रायश्चित्त न करी पुनीत। ज्या तोही पुनीत दत्तनामें ॥ ३ ॥
नामाविना कर्म सांग नोहे धर्म। नाम घेतां शर्म आदीं अंतीं ॥ ४ ॥
वदतां वासुदेव पितर ऋषिदेव। तृप्त होती सर्व दत्तनामें ॥ ५ ॥

---

## २८८ अभंग

कृतयुगिं सुखिं ये ध्याना। जेथ होतीं साधनें नाना ॥ १ ॥
त्रेतायुगीं यागीं लोकां । श्रद्धा योजी दे जी सुखा ॥ २ ॥
द्वापारीं ती उपासना । भक्तियोगें तारी जना ॥ ३ ॥
कलिमाजीं हरिभजन । प्रेमें कीजे भवबंधन ॥ ४ ॥
वासुदेव म्हणे मुनी । गातां जाती जन तरोनी ॥ ५ ॥

---

## २८९ अभंग

अन्न प्राण मन वदती विज्ञान। सुख हे कोश शोधून वळखा आत्मा ॥ १ ॥
पूर्वोपरजनू अन्नमय तनू। जाणवी आत्मा म्हणूं कां आद्यंता ॥ २ ॥
इंद्रियचालक शरीरव्यापक । जड हा प्राण ऐक केवीं आत्मा ॥ ३ ॥
गृहादिक माझें देह मी म्हणे जें । कामादिकां भजे मन तें न आत्मा॥४॥
जागरीं देहा व्यापी बुद्धी लपे स्वापीं ।न आत्मा जडरूपी विज्ञानमय॥५॥
कर्तृत्वें करणत्वें हें अंतःकरण । बाहेर आंत मनबुद्धीभेदें ॥ ६ ॥
अंतःकरणवृत्ती सुखोपमभागीं । केव्हां पुण्यभोगीं मग घे झोप ॥ ७ ॥

---

## २९० अभंग

आतमा अज पर अजर अमर। त्यावरी विकार नर आरोपी ॥ १ ॥
हेचि आत्महत्या करी जो पामर। तो घोर आसूरलोकीं जायी ॥ २ ॥
अंधतम जेथें घनदाट आहे । तेथें क्लेश साहे राहे नित्य ॥ ३ ॥
वासुदेव म्हणे आत्महत्ये असें। दुजें पाप नसे नासेना जें ॥ ४ ॥

---

## २९१ अभंग

जिता जागेपणीं तो मरतां स्वप्नीं । रडती आक्रोशूनी तयालागीं ॥१॥
जागेपणीं मेला स्वप्नीं तो पाहिला । तरी घे हर्षाला तावन्मात्र ॥ २ ॥
हें असत्य असे संसारींही तसें । जें जें दिसतसे तें असत्य ॥ ३ ॥
म्हणे वासुदेव हें मायावैभव । याचा हो अभाव निद्रेमाजीं ॥ ४ ॥

## २९२ अभंग

जळो जळो उंचपण । दावी नरक दारुण ॥ १ ॥
जळो जळो मानापमान । दावी शेखीं यमदंडन ॥ २ ॥
जळो जळो पूजास्तुती । दावी अंतीं जे विपत्ती ॥ ३ ॥
जळो जळो जात्यभिमान । दावी मूढा जो बंधन ॥ ४ ॥
जळो जळो देहाभिमान । दावी अज्ञा जन्ममरण ॥ ५ ॥
दत्तदेवाचें भजन । तारी लीना भवभंजन ॥ ६ ॥

## २९३ अभंग ( परोक्षत्वेन दत्तात्रेयस्तुतिः )

जो वसे दक्षिणदेशीं । दाक्षिणात्य भजती ज्यासी ॥ १ ॥
गंधर्वस्थित जो देव । भक्तांचा पुरवी भाव ॥ २ ॥
कलियुगीं जो प्रख्यात । श्रुति नेणे ज्याचा अंत ॥ ३ ॥
मार्गशीर्षमासीं ज्याचा । जन करिती उत्सव साचा ॥ ४ ॥
वासुदेव त्याचे पाय । नमी हरिती जे अपाय ॥ ५ ॥

## २९४ अभंग

पदाति पांगुळा डोळस आंधळा । विद्वानही खुळा बळी भोळा ॥१॥
वाग्मि मोना कान असतां भेरा जन । तुटोनि बंधन स्थिर राहे ॥२॥
अशा पाशीं देव सदां घेतो धांव । ठेवी जीव भाव दत्त तेथें ॥३॥
ह्या कूटा जाणुनी रमे जो भजनीं । त्यापुढें येऊनी दत्त नाचे ॥४॥

## २९५ भजन

कृष्णातीरीं वसणाऱ्या । ये औदुंबरिं बसणाऱ्या ॥ ध्रु० ॥
स्वभक्तचित्तीं असणाऱ्या । भक्तसंग्रह करणाऱ्या ॥ १ ॥
सह्यगिरीवरि असणाऱ्या । प्रत्यहिं माहुरिं निजणाऱ्या ॥२॥
करविरिं भिक्षा करणाऱ्या । सारापुरीं जेवणाऱ्या ॥ ३ ॥
काशीक्षेत्रीं न्हाणाऱ्या । भक्तसंकटीं धांवणाऱ्या ॥ ४ ॥

---

## २९६ अभंग

भेटीलागीं माझें मन उतावीळ । कईं मी पाउलें पाहिन डोळां ॥१॥
ऐसें कृष्णातीर वृक्ष औदुंबर । ऐसा जगदोद्धार देव कोठें ॥ २ ॥
धन्य तेथें जन भावार्थी सज्जन । वैकुंठचि जाणा प्रत्यक्ष हें ॥ ३ ॥
स्वर्गींचे सुरवर वांछिताति जन्म । पाहाया चरणयुग्म अखंडित ॥ ४ ॥
पाहुनियां वासू श्रीदत्तपादुका । आल्हादुनि देखा नाचतसे ॥ ५ ॥
श्रीमद्दत्तात्रेय येथें नांदताहे । नरसिंहसरस्वती ये यतिरूपें ॥ ६ ॥

---

## २९७ अभंग

दत्तनामें पाप पळे । मग सर्व विघ्न टळे ॥ १ ॥
मग ध्यानीं राहे मन । अनायासें होय ज्ञान ॥ २ ॥
ज्ञानें सर्व पाप नासे । असें दुजें पावन नसे ॥ ३ ॥
स्वप्नीं नाना पापें होती । जागेपणीं तीं न बाधती ॥४॥
स्वप्नपापा प्रायश्चित्त । जागा होतां कोण घेत ॥ ५ ॥
वासुदेव म्हणे ज्ञान । होतां होतो नर पावन ॥ ६ ॥

---

## २९८ अभंग

चंदनाचे वनीं अन्यवृक्ष वसे। चंदन होतसे शीत सुगंध ॥ १ ॥
चंदनाचे परी तोही ताप वारी। शीतलता करी बरी सर्वां ॥ २ ॥
दैवें संतांचिया जवळी राहती। तेही संत होती गती दाते ॥ ३ ॥
कर्म उपासना सांगूनि तें ज्ञान। उद्धरती दीनजनांतें ही ॥ ४ ॥
वे त्रिविध पाप वारिति त्रिताप। तेचि दत्तरूप वासु म्हणे ॥ ५ ॥

## २९९ अभंग

सेवावे संत जन। वंदावे लीन होऊन ॥ १ ॥
उदार संत मुक्त। करिती ते कर्मबाधित ॥ २ ॥
पुण्य पाप जें संतांचें। हिशेदार असती त्याचे ॥ ३ ॥
संतांच्या सुकृता घेती। जे भावें त्यां सेविती ॥ ४ ॥
संतांच्या पापा घेती। जे दुष्ट त्यां द्वेषिती ॥ ५ ॥
वासुदेव म्हणे संतां। दत्त मानी आत्मवत् ॥ ६ ॥

# पदसमूह

## गणपतीचीं पदें

### ३०० पद ( चाल—तुम्हां तो शंकर० )

गणपति शुभमति सद्गति दे ॥ध्रु०॥ सिद्धिबुद्धीश्वरा तूंचि लंबोदरा मोरया मोरया मोरया ॥ परशु करिं घेउनी विघ्नवन छेदुनी अभय वरदेउनी भाव तव दे ॥ शुभमति० ॥१॥ सर्व संकटहरा पार्वती कुमरा मोरया मोरया मोरया ॥ पूर्ण करिं बा दया वारुनी सन्नय वारिं संसृतिभया भाव तव दे ॥ शुभमति० ॥ २ ॥ रक्तवसनलेपन रक्तवरभूषणा मोरया मोरया मोरया ॥ शूर्पकर्णा गणाधीश्वरा धीश्वर श्रीश्वरा सर्वदा ते स्मृती दे ॥ शुभमति० ॥ ३ ॥

## ३०१ पद ( चाल—खरि झाली दृष्ट माझ्या० )

शिवतनया विघ्नराया लवकर ये धाउनि ।। जय मोरया वेदगेया हाक माझी परिसुनी ।। ध्रु० ।। निर्गुण तूं निर्विकार अज अमरतारण ।। बहिरंतर्व्यापकत्वें सर्वांचा कारण ।। असुनि स्वयें तूंचि होसी धर्माचा धारण ।। सगुणपणें कोण जाणे तव महिमा या जनीं ।। शिवतनया० ।। १ ।। श्रुति वदती तूं गणांचा गणपती म्हणुनियां ।। कवि कवींचा ज्येष्ठराज तूं असती मोरया ।। ब्रह्माचा ब्रह्मणस्पति गणपति तूं करिं दया ।। निरवद्या विश्ववंद्या ये आद्या धाउनी ।। शिवतनया० ।। २ ।। संकटीं पार्वतीनें स्मरतां तूं सत्वर ।। येउनियां स्वीय माया पसरुनियां आसुर ।। पळवुनियां पुत्र होसी तीचा लंबोदर ।। दरहर तूं विश्वहेतू ये धावा परिसुनी ।। शिवतनया० ।। ३ ।।

---

## ३०२ पद ( चाल—प्राप्त होय जें निधान० )

गणाधिनाथा पवित्रगाथा माथा तव पदिं ठेवूं ।। चतुर्थीचा उत्सव करुनी दूर्वांकुर तुज वाहूं ।। ध्रु० ।। सिंदुरचर्चितमस्तक सिंदुरदनुजारी तूं थोर ।। सर्व संकटें वारुनि विघ्नें स्मरतां करिसी दूर ।। १ ।। विद्यारंभीं उत्सवकालीं जातां येतां नाम । मंगलधाम स्मरतां तूझें मोरया पुरविसी काम ।। २ ।। पाशांकुशरदवरदकरा तूं असती जगतीं हेतू ।। स्मरतां भक्तां गती देसि तूं तारक आमुचा तो तूं ।। ३ ।। लड्डुक-मोदकभक्षणकारक शक्तिविधारक एक ।। तो तूं विनायक गजास्य तारक भाविकभयहारक ।। ४ ।। रक्तचंदनप्रसूनवसन प्रियदूर्वांकुर पूज्य ।। साज्य खाद्याच्या नैवेद्या घेऊनि सुख दे प्राज्य ।। गणाधि-नाथा० ।। ५ ।।

---

## ३०३ पद ( चाल—सुंदर मुख तुंदिल० )

गजवदना सुखसदना शंभुनंदना ॥ विघ्न हरुनि निघ्न करुनि रमवि मम मना ॥ ध्रु० ॥ कृतयुगिं तूं पङ्क्तिहस्त सित विनायक ॥ सिंहवहन विघ्नदहन भजकपोषक ॥ त्रेतायुगिं मयुरसंगि मयुरपालक ॥ चाल० ॥ देवा भावा भावा जाणसि तूं षट्कर तूं सद्धेतू स्वर्ण-शोभना ॥ १ ॥ द्वापारीं गजवदना आखुवाहना ॥ रक्तवर्ण शूर्पकर्ण परमशोभना ॥ पाशांकुशरदवरकर विघ्नभंजना ॥ चाल ॥ गणपा पापा तापा परिहरसी वर देसी भय हरिसी रक्षिसी जना ॥ २ ॥ कलियुगिं तो तूंच साथ येथ प्रगटसी ॥ होउनियां द्विभुज अश्वपृष्ठिं बैससी ॥ धूम्रवर्ण तूर्ण भक्तकाम पुरविसी ॥ चाल ॥ दरदा वरदा परदा विघ्नहरा भक्तपरा भवतारा तारिं निजजना ॥ गजवदना० ३ ॥

---

## ३०४ गणपत्यादि देवांचे अभंग

देवगणाधीश आद्य मयूरेश । वंद्य जो विघ्नेश ईशपुत्र ॥ १ ॥
स्मरतां विघ्नवना जाळी गजानना । गौरीच्या नंदना मना चिंती ॥२॥
स्मरणें जयाच्या सर्व संकटांच्या । होळी होती त्याच्या चिंती पदा॥३॥
आपदा हरूनि संपदा देऊनी । तारी निशीदिनीं ध्यानीं ध्यात्या ॥४॥
त्याचे कृपादृष्टी सुखी हो हे सृष्टी । त्या ध्याऊं संकष्टीं पुष्टी दे जो ॥५॥

---

## ३०५ अभंग

गणराया ये मोरया । सदया ये देववर्या ॥ १ ॥ तुजविण कोण तारी । विघ्नभीती हे निवारी ॥ २ ॥ विघ्नकर्ता विघ्नहर्ता । तूंचि एक जगद्भर्ता ॥ ३ ॥ तव चरण शरण आर्ता । विघ्नाची नुरवी वार्ता ॥ ४ ॥ धरिले म्यां तव चरण । आतां कैचें ये मरण ॥ ५ ॥

## ४०१ संध्यापद ( चाल—इस तनधनकी० )

आत्मारामा अंतरीं ध्यावूं । जनिमरणातीत होवूं ॥ ध्रु० ॥ ज्या मानस सरोवरीं स्नान । केलें शांतिवस्त्रावरण ॥ आशातृष्णामोह जाळून । अंगिं चर्चिं भस्मलेपन ॥ क्षमादयेचें भूषण । लावुनि शुचि होऊन ॥ चाल ॥ आवरणा आचमन करूं कर्माचें मार्जन । ममताऽहंताऽघमर्षण । तीन देह हीं अर्घ्यें देवूं ॥ आत्मारामा० ॥ १ ॥ तो मी आत्मा आत्मा तो मी । वदे भावें माझा जप तो ॥ ज्या जपें भेद न उरतो । अपरोक्षचि होतो पर तो ॥ ज्या जपें मुमुक्षु तरतो । जीवन्मुक्तीला वरतो ॥ चाल ॥ शिवा जीवा भेटवितो । संसारा ह्या लपवितो ॥ तारि तो म्हणवुनि गावुं ॥ आत्मारा० ॥ २ ॥ सूर्यचंद्र जेव्हां दोनी । नभिं लपती गति सोडूनी ॥ तो संध्याकाळ गुरूनीं । सांगितला तो साधूनी ॥ भावें ऐसी संध्या करुनी । संदेह मनिंचा हरुनी ॥ चाल ॥ सर्व हेंचि ब्रह्म जाणूनी । राहें ऐशा उपस्थानीं ॥ आपणा आपण नमुनी । ध्यानीं राहूं उपशम घेवूं ॥ आत्मा० ॥ ३ ॥

---

## ४०२ पूजापद ( चाल-हरिसी सतत भजा० )

सर्व शरिरिं जें एक विराजे । तेंचि आत्मलिंग माझें ॥ध्रु०॥ देह-देवालय शुद्ध करुनियां, आत्मलिंगावर भासलें जें ॥ अज्ञान तेंचि निर्माल्य हेंचि काढुनि टाकूं छादक जें ॥ सर्व० ॥ १ ॥ अचिंत्याचें चिंतन कैंचें आवाहन न च व्यापक जें ॥ निर्मल त्याला स्नान कशाला निरावरणा वस्त्र न दुजें ॥ सर्व० ॥ २ ॥ भक्ति विलेपन वाहूं एक सुमन अहं धूप जाळूं बहुतेजें । सोऽहंदीपा उजळुनि विश्वपा निवेदिं सर्वहि निजधन जें ॥ ३ ॥ स्वयंप्रकाशा आरत्या कैशा ओंवाळुं भावें एकच जें । पिंडीं ब्रह्मांडीं त्या कुरवंडी मौन जपे एक भावें भजे ॥ ४ ॥ प्रसाद त्याचा स्वानुभवाचा भोज्य हें परितृप्त करी जे ॥ स्वानुसंधानीं सुखमयशयनीं स्वानुभूतिसह तेथ निजे ॥ सर्व शरिरिं जें एक विराजे० ॥ ५ ॥

# वेदान्तस्तोत्रें

## ४०३ वेदांतनिरूपण

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीदत्तात्रेय गुरूंचे गुरु । स्वभक्ताचे कल्पतरू । वंदोनि भवाब्धितारू । वेदांत निरूपितों स्वल्प ॥ १ ॥ गुरुवीण नोहे ज्ञान । असें श्रुतीचें वचन । हें मानुनी निरूपण । करितों गुरुशिष्य-संवादें ॥ २ ॥ शिष्य गुरूसी पुसतसे । ही सृष्टी कोण करीतसे । किंवा स्वभावें होतसे । संशय होतसे हा फेडा ॥ ३ ॥ गुरु म्हणे समाधान । एकाग्र करूनी मन । परिसें करितों निरूपण । वेद प्रमाण घेवुनी ॥ ४ ॥ श्वासापरी अनायासानें । वेद कथिला ईश्वरानें । त्याला पौरुषेय म्हणणें । न साजे अन्याधारापरी ॥ ५ ॥ संहिता ब्राह्मण अरण । हीं तीनीही मिळोन । हा वेद, अंगें जाण । शिक्षादीक सहाची ॥ ६ ॥ कर्म उपासना ज्ञान । तीन कांडें वेदाचीं जाण । स्मृतीतिहास पुराण । वेदाधारें पसरले ॥ ७ ॥ त्यां स्वतः प्रमाण वेदाचें । मत हें ऐक तूं साचें । हें ठाणें समाधानाचें । सत्य त्रिवाचें बोलतों ॥ ८ ॥ जी गारा केलेली माती । तिचे पुढें घडे होती । घड्यापूर्वीं जी माती । मध्यें अंतीं तीच एक ॥ ९ ॥ सृष्टीपूर्वीं विश्व हेंच । अद्वितीय ब्रह्म एकच । नामरूप हीं नव्हतेंच । जिव्हा मन नसल्यामुळें ॥ १० ॥ शिष्या तुझ्या समजुतीस । पूर्वीं ह्या काळ-वाचकास । बोलिलों परी तेव्हां खास । काळ न द्वैतास दाविणार ॥ ११ ॥ निर्विकारा न घडे सर्जन । मायेसहिताचें ग्रहण । करिता नये द्वैतपण । शक्ति जाण अवस्तु माया ॥ १२ ॥ शक्ति शक्तिमंता अभेद । मिथ्या प्रतिबिंबे न भेद । न ये चंद्रा निर्विवाद । मायेनें भेद नसता ब्रह्मा ॥ १३ ॥ जें उपाधीनें भासे । तें उपाधी नासतां नासे ।

त्याणें द्वैत येईल कसें । खऱ्या स्वरूपा ॥ १४ ॥ जे अनिर्वचनीय शक्ती । ती वेदांती माया म्हणती । असे ब्रह्माधीन ती । तिणें द्वैत येत नसे ॥ १५ ॥ त्या माया शक्ती युक्त । ब्रह्म हो अव्याकृत । हें जगद्बीज अव्यक्त । त्रिगुणात्मक होतसे ॥ १६ ॥ त्यापासूनि शब्दयुक्त आकाश । त्या पासून वायू सशब्द स्पर्श । त्या पासून अग्नि खास । शब्दस्पर्शरूपगुणे ॥ १७ ॥ सशब्दस्पर्शरूपरस । जळ उपजे त्या पासाव खास । सशब्दस्पर्शरूपरस । गंध भूमी ॥ १८ ॥ कारणगुण कार्या येती । तसे मायागुण पंचभूतीं । म्हणोनी त्रिगुणात्मक होती । पंचभूतें तीं मायिक ॥ १९ ॥ प्रत्येकाच्या सत्वांशेंकरून । श्रोत्र त्वचा चक्षु जिह्वा घ्राण । पंचज्ञानेंद्रियें होती जाण । अंतःकरण सत्वांशैक्यानें ॥ २० ॥ निर्विकल्प अंतःकरण । संकल्पात्मक मन निश्चयात्मक बुद्धि जाण । अनुसंधानरूपी चित्त ॥ २१ ॥ अहंकार मीपण । हें पंचविध अंतःकरण । प्रत्येक रजोंशानें जाण । कर्मेंद्रियें पांच हीं ॥ २२ ॥ वाचा हस्त पाद लिंग आणि गुद । रजौंशैक्यें प्राणभेद । पंच तयांचे वृत्तीनें ॥ २३ ॥ यांचे देवता विषय । एक ब्रह्मचि स्वयें होय । प्राणेंद्रियांतःकरणसमुदाय । लिंगशरीर होय सूक्ष्म ॥ २४ ॥ पंच भूतांचे दोन दोन भाग । एका एका अर्धाचे चार भाग । करोनी दुसऱ्या अर्धाशीं योग । करितां होय पंचीकरण ॥ २५ ॥ ह्या पंचीकृतापासून उद्भिज । स्वेदजांडज जारज । होती चौदा लोक विराज । सर्व एक मिळोन ॥ २६ ॥ ह्या चारी देहांत । जीवरूपें ब्रह्म स्थित । कर्तृत्व भोक्तृत्व पावत । मोक्षापर्यंत द्वैतभावें ॥ २७ ॥ जाग्रत्स्वप्न सुषुप्ती । दैनंदिन व्यवहार म्हणती । जन्म घेणें हें वेदांती । म्हणती जन्मांतरस्वीकार ॥ २८ ॥ हा जीवाचा संसार । ईश्वरसृष्टीवर । अहंताममतादि व्यवहार । हे प्रातिभासिक जीवसृष्टी ॥ २९ ॥ पारमार्थिक ब्रह्मावर । ईशसृष्टि अनिवार । हा व्यावहारिक

संसार। ईश्वराचा ॥ ३० ॥ हें सर्वही द्वैत। निवारिजे होवुनी अद्वैत। तरीच होय सदोदित। सच्चिदानंद निजांगें ॥ ३१ ॥ सर्वाधिष्ठान ब्रह्म जेधवां। विवेकें कळे तेधवां। करोनि द्वैताभावा। होय सच्चिदानंद निजांगे ॥ ३२ ॥ ब्रह्मचि सर्वाधिष्ठान। तेंचि उत्पत्तिस्थितिलयकारण। म्हणोनि त्या एकाचें ज्ञान। होतांच सर्व ज्ञान होतसे ॥ ३३ ॥ अत एव वेदांतमत। सिद्ध करी अद्वैत। तार्किकादिकांचा राद्धांत। घेतां अद्वैत साधेना ॥ ३४ ॥ प्रकृतिपुरुषविवेक। तत्त्वविचार करितां चोख। मोक्ष होतो हा लेख। सांख्याचा एकत्व न दावी ॥ ३५ ॥ पुरुष हा उदासीन। प्रकृति जगत्कारण। प्रतिशरीरीं भोक्ता जीव भिन्न। जगत् सत्य हें जाण सांख्यमत ॥ ३६ ॥ स्वयें प्रकृति जड असून। ती केवीं करील जगदुत्पादन। न चालती चेतनावीण। अचेतन रथादिक ॥ ३७ ॥ तूं म्हणशील स्तनातून। दूध वाहे अचेतन। जळही स्वयें जातें वाहून। हेही जाण ईश्वरेच्छा ॥ ३८ ॥ तीन गुण समान। हे सांख्य प्रकृती प्रधान। तया नसतां प्रेरक चेतन। केवीं गुणविभाग होईल ॥ ३९ ॥ गाईचे पोटीं तृण। दुग्ध होतें तेंवी प्रधान। जगदाकार होऊन। स्वयमेव राहे म्हणसी जरी ॥ ४० ॥ तरी हेंही न घडेल। तृण खाई बैल। त्याचें दुग्ध कीं होईल। तसे न होईल प्रकृति जगत् ॥ ४१ ॥ जसा स्वये आंधळा। चालवी डोळस पांगुळा। तेवीं पुरुष प्रकृतीला। चालवी म्हणों तरी न घडे ॥ ४२ ॥

## ४०४ परापूजा

सृष्टि पूर्वी विश्व एकचि हा देव। होता स्वयमेव सच्चिदानंद ॥ १ ॥
बहु व्हावें ऐसी कामना धरूनी। तप आचरोनी स्वयें नटे ॥ २ ॥
झाला अव्याकृत स्वयें पंचभूत। भौतिकही होत चारी खाणी ॥ ३ ॥
तोचि लिंगदेह तो कारणदेह। ब्रह्मांडसमूह तोचि झाला ॥ ४ ॥
अध्यात्माधिभूत तो आधिदैवत। जीवरूपें आंत रोघे तोचि ॥ ५ ॥
तोचिं अंतर्यामीं बाहेर तो स्वामी। भुलोनि तोचि मीपणें बद्ध ॥ ६ ॥
मग दिसे नाना तत्त्व समजेना। भावरवे मना नाना यत्नें ॥ ७ ॥
गमवी सुखरूप आवरण झोंप। घेतां ये विक्षेप ताप दे जो ॥ ८ ॥
मग सद्गुरूचे धरिले म्यां पाद। शमवाया खेद भेद सर्व ॥ ९ ॥
भ्रमनिरसना दिल्ही उपासना। त्या देवाची मना स्थिरवाया॥ १० ॥
देव तो उपास्य हा मी उपासक। मानीता विवेक चोख झाला॥ ११ ॥
गुरु तोचि देव हा मी स्वयमेव। तोचि भिन्नभाव नष्ट झाला ॥१२॥
साकार साजिरें रूप जें गोजिरें। चिंतिलें जें बरें सच्चिदानंद ॥१३॥
सोडुनि नामरूप सच्चित्सुखरूप। झालों एकरूप मीच देव ॥१४॥
परी मी हा भक्त नोहेचि विभक्त। परम विरक्त मुक्तसंग ॥१५॥
ऐक्यस्फूर्ति झाली भक्ति दुणावली। आतां सीमा झाली कैवल्याची ॥१६॥
जसें पाषाणाचें कोरिलें देऊळ। पाषाण केवळ देव त्यांत ॥ १७ ॥
देवाचा परिवार पाषाण सुंदर। वस्त्र अलंकार पाषाणाचि ॥ १८ ॥
असें मज आतां उमजे सर्वथा। पूजा करूं जातां देवचि सर्व ॥१९॥
देव गुरूची ही झाली कृपा पूर्ण। उमजलें तूर्ण पूर्ण ब्रह्म ॥ २० ॥
देवा तुझी आतां कशी करूं पूजा। न दिसेचि दूजा आज मज ॥२१॥
मी तूं एक पूर्ण होतां आवाहन। कैसें हो करून पूजूं देवा ॥ २२ ॥

तूंचि एक देवा भू वृक्ष पाषाण। तुजला आसन योजूं केवीं ॥ २३ ॥
तुज अभिषेक करूं तरी एक। दिससी उदकरूपीं तूं बा ॥ २४ ॥
देवा जे जे द्यावे तुज उपचार। ते सर्व साचार रूप तुझें ॥ २५ ॥
स्रुवा द्रव्य अग्नि मंत्र यजमान। तूंचि हें जाणून होमूं कवणा ॥२६॥
पात्र द्रव्य दाता एकचि दिसतां। दानाची हे वार्ता केवीं करूं ॥२७॥
एकाग्रता चित्तासह इंद्रियांची। होतां ही तपाची वार्ता नसे ॥ २८ ॥
देहादिव्यापार असंग निरीक्षीं। अकर्ता मी साक्षी कर्मातीत ॥२९॥
अप्रमत्तपणें जरि एक जाणें। मग योग ठाणें देईल कीं ॥ ३० ॥
दैवलब्ध भोग हे घे उपचार। स्तोत्र वाग्व्यापार असो देवा ॥ ३१ ॥
संचार ह्या देवा मानूं प्रदक्षिणा। तुझी आराधना सर्व क्रिया ॥३२॥
वाचे मना जेथें अवकाश नसे। मौनभावें वसे तेथें जप हा ॥३३॥
अशी ही सहजस्थिति देवपूजा। तुज अधोक्षजा हे आवडो ॥३४॥
कांहीं न्यून नोहे अधिकही नोहे। ब्रह्मिष्ठाचें तें हें महिमान ॥३५॥
हेंचि सर्व स्वात्म-निवेदन होय। होई ब्रह्ममय सर्व कर्म ॥ ३६ ॥
ऐसी हे करावी मुख्य देवपूजा। न घडे तरी पूजा ती पढावी ॥३७॥
वासुदेव म्हणे पूजा ही त्रिकाळ। पढतां विमळ होईल बोध ॥ ३८ ॥

इति श्री० प० प० श्रीवासुदेवानन्दसरस्वतीविरचिता
परा पूजा संपूर्णा ॥

---

## ४०५ नवरत्नमाला

श्रीदत्तो जयति ॥ हा देह दृश्य जड अन्नविकार मातातातास्त्रवीर्यज अमंगळ जीव जाता ॥ प्रेता न पाहति न हा मम रूपभूत। कूटस्थ मी तरि सदोदित साक्षिभूत ॥ १ ॥ त्वङ्मांसलोहितशिरास्थिसमूह देह। ज्या आंत श्लेष्ममळमूत्रचि मोहगेह ॥ हें होय नष्ट जलबुद्बुदसें

अनंत। कूटस्थ मी तरि सदोदित साक्षिभूत ॥ २ ॥ मायाविनिर्मित पदार्थसमान देह। जो बिंदुमात्र असतांहि विमोहगेह ॥ वाढे क्षणोक्षणिं विलक्षण निश्चितांत ॥ कूटस्थ मी तरि सदोदित साक्षिभूत ॥ ३ ॥ पाण्यावरी लहरि येति जशा तशा ह्या। देहावरी सतत येति दशा अशा ह्या ॥ बाल्यादि, शेखि कृमिविड्भसितांत कांत। कूटस्थ मी तरि सदोदित साक्षिभूत ॥ ४ ॥ यद्रक्षणार्थ करिताति कुकृत्य दुष्ट। जो षड्रसान्नपरिपोषित होयि पुष्ट ॥ येथेंचि तो पडतसे उघडा अनंत। कूटस्थ मी तरि सदोदित साक्षिभूत ॥ ५ ॥ वर्णाश्रमादिक सुखादिक यन्निमित्त। संबंध रूप भय कर्महि यन्निमित्त ॥ तो हाचि अन्नमय कोश जयासि अंत। कूटस्थ मी तरि सदोदित साक्षिभूत ॥ ६ ॥ हा प्राण त्यामाधिं सदोदित खेळताहे। जो इंद्रियां कवळुनी, मम रूप नाहे ॥ हेही अचेतनचि, चेतन मी प्रशांत। कूटस्थ मी तरि सदोदित साक्षिभूत ॥ ७ ॥ जें चंचळ क्षणभरी न वसे, विकारी। तें होय हें मन न मी कधिंही विकारी ॥ खद्योततुल्य मति तीहि न मी, प्रदीप्त। कूटस्थ मी तरि सदोदित साक्षिभूत ॥ ८ ॥ हा जात येत असतो जगिं लिंगदेह। अज्ञान कारणतनू न च तीन देह ॥ माझें स्वरूप अज आक्रिय मी अनंत। कूटस्थ मी तरि सदोदित साक्षिभूत ॥ ९ ॥ कर्ता न मी प्रत्यगभिन्न आत्मा। भोक्ता न मी अद्वय सच्चिदात्मा ॥ हें ज्ञात व्हाया नवरत्नमाला। हे कंठिं घाला हरि हे हि काला ॥ १० ॥ जो कर्मफळ दे वारी स्मरतां कष्ट उद्धरी ॥ भजतां त्या दत्तदेवा पदीं हे अर्पिली नवा ॥ ११ ॥

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंदविरचिता नवरत्नमाला संपूर्णा॥

---

## ४०६ चित्तसद्बोधनक्षत्रमाला

कुसंगाश्रयें वा स्वयें आत्मघात। तुवां सत्य केला कुशीला खचीत ॥ अधःपात येईल मत्ता स्वचित्ता। त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥१॥ भला लाधला हा तुला श्रेष्ठ देह । परी ठेविला व्यर्थ तूं येथ मोह ॥ अहंकारयोगें घडे घात चित्ता ॥ त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥ २ ॥ अहंकारयोगें घडे कर्तृतादि। अहंकारयोगें घडे भोक्तृतादि॥ अहंकारयोगें ममत्वादि चित्ता। त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥ ३ ॥ अहंकार हा आत्महा खालिं नेतो ॥ अहंकार हा ज्ञानहा ऊर्ध्व नेतो ॥ अहंकार सोडूनि दे शीघ्र चित्ता। त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥ ४ ॥ अहंकारयोगें घडे कोप ताप। अहंकारयोगें घडे पापलेप॥ अहंकारयोगें जगीं घात चित्ता ॥ त्वरें आदरें तूं स्मरें नित्य दत्ता ॥५॥ अहंकार हा धर्महा शत्रु आहे ॥ अहंकार हा पापहा मित्र आहे ॥ अहंकार सात्वीक हो मित्र चित्ता। त्वरें आदरें तूं स्मरें नित्य दत्ता ॥ ६ ॥ अहंकार हा बोलिजे त्रिप्रकार। अहंकार हा बंध दे द्विप्रकार ॥ तयाचा करी तूं प्रतीकार चित्ता। त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥ ७ ॥ शरीरादिकीं जो अहंकार थोर। अती घोर तोची तमाचा विकार ॥ भ्रमालस्यतंद्रादि दे तोचि चित्ता। त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥ ७ ॥ सदा क्रोधलोभप्रयत्नादि दे जो। सदा पातकोत्पत्ति येथें करी जो ॥ तया राजसा सर्वथा सोडि चित्ता। त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥९॥ तुला लाधलें हें भलें मुक्तिपर्व। परी अंतरीं तूं धरीसी कुगर्व ॥ तुझे षड्रिपू घातकी होति चित्ता ॥ त्वरें आदरें तू स्मरे नित्य दत्ता ॥ १० ॥ तुला खंडिती मुंडिती याम्य दूत। तुला दंडिती फाडिती होसि भूत ॥ प्रभूतश्रमें कष्टता कोण त्राता। त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥११॥ दुराशा धरूनी तुवां पाप केलें। तयाच्या-नियोगें तुला जन्म आले ॥ असें पूढती पूढती होय चित्ता। त्वरें आदरें

तूं स्मरे नित्य दत्ता ॥१२॥ सुत स्त्री स्व माझें असें हें ममत्व । तसें मांस पिंडावरी ही अहंत्व ॥ तुवां ठेविल्यानें तुला दुःख चित्ता । त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥१३॥ कुणाचे सुत स्त्री कुणाची विचारी । कुणाचें धनक्षेत्र होई विचारी ॥ विचारांतिं मिथ्याचि हो सर्व चित्ता । त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥१४॥ ममत्वें सुतादीक हे आदरावे । जयानें तयानें भ्रमानें मरावें ॥ पुढेंही तसें होतसें खास चित्ता । त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥ १५ ॥ तुला या भ्रमें सद्गती लोकिं हो कीं । नको आदरूं प्रेमसंबंध लोकीं ॥ सुख स्वप्नवत्तुच्छ हें सोड चित्ता । त्वरें आदरें तूं स्मरें नित्य दत्ता ॥ १६ ॥ नको मानपूजेचि लोकांत इच्छा । प्रतिष्ठाहि विष्ठासमानाचि तुच्छा ॥ न पृच्छा करीं व्यर्थ तूं लोकिं चित्ता । त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥ १७ ॥ सुविद्वान् धनी मी गुणी मानि मोठा । असा तूं न ठेवी वृथा गर्व ताठा । नमीं सर्व भूतांसि हो लीन चित्ता । त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥ १८ ॥ नको होउं तूं लोकनिंदेस पात्र । नको लोकनिंदा करू हो सुपात्र ॥ पवित्र प्रभूच्या कृपेला सुचित्ता ॥ त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥ १९ ॥ जनीं निंद्य तें सोडितां योग्यता ये ॥ जनीं वंद्य तें सेवितां योग्यता ये ॥ जनीं वंद्यता तूं न इच्छी सुचित्ता । त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥ २० ॥ सदा संगती दुर्जनांची त्यजावी । सदा संगती सज्जनांची धरावी ॥ धरावी गुरूसेवनीं प्रीति चित्ता । त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥ २१ ॥ सदा सत्त्ववृत्ती धरोनी असावें । सदा सात्विकांमाजिं यत्नें बसावें ॥ बसावें न त्या क्षीणपंक्तीस चित्ता । त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥ २२ ॥ भ्रमालस्यनिद्रादिकांते त्यजावें । हरीकीर्तनीं प्रेम निःसीम व्हावें । मनीं आळवावें हरीला सुचित्ता ॥ त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥ २३ ॥ कथाकीर्तनीं अंगिं रोमांच यावे । गळा दाटुनी नेत्र दोनी गळावे ॥

पळावें वपुर्भान भावेंचि चित्ता । त्वरें आदरें तूं स्मरें नित्य दत्ता ॥ ॥ २४ ॥ असें सात्विक प्रेम येतां अंहता । गळे तैं टळे सर्व संसार-चिंता ॥ हरीच्या प्रसादें मिळे मुक्ति चित्ता ॥ त्वरें आदरें तूं स्मरें नित्य दत्ता ॥२५॥ गुरू देव हे एक मानूनि भक्ती । तयांची करी त्या करीं येइ मुक्ति । सुयुक्ती असी ही धरी नित्य चित्ता । त्वरें आदरें तूं स्मरे नित्य दत्ता ॥ २६ ॥ असी चित्तसद्बोधनक्षत्रमाला । गळा घालिती ते न भीतील काळा ॥ बळां मुक्ति घालील रत्नांचि माळा । गळां त्यांचिया जी न पाहील वेळा ॥ २७ ॥

इति श्री. प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीकृता चित्त-सद्बोधनक्षत्रमाला संपूर्णा ॥

---

## ४०७ आत्मानात्मविचार

श्रीदत्तो जयति ॥ शिष्या होयीं सावधान । करूनियां एकाग्र मन । परिसें कथितों आत्मज्ञान । जेणें अज्ञान निरसें हें ॥ १ ॥ बाहेर नेत्र लावून । जें पाहसी तेंचि स्वप्न । व्यर्थ तयासी भुलून । आयुष्य खर्चून मरूं नको ॥ २ ॥ पृथ्वी आप तेज वात । आकाश जाण पंच भूत । मायाशक्तीश्वरनिर्मित । त्रिगुणयुक्त असतीं हीं ॥ ३ ॥ प्रत्ये-काचे अर्ध अर्ध भाग । करूनि अर्धाचे चार चार भाग । सोडोनि आपुला भाग । इतरार्धभागयुक्त केले ॥ ४ ॥ ह्या पंचीकरणें जाण । ब्रह्मांड चौदा भुवन । चारी जीवखाणी आणि अन्न । करी निर्माण ईश्वर ॥ ५ ॥ हे विक्षेपनांवाची । ईश्वरशक्ती होय साची । वेदीं संज्ञा असे ईची । व्यावहारिक सत्य ॥ ६ ॥ जीव देहीं रिघून । अहं-कारतादात्म्य पावून । त्या द्वारा शरीर व्यापून । नेत्रीं राहून द्वैत पाहे ॥ ७ ॥ तें हें सर्व स्वप्न जाण । कां जासी याला भुलून । अजूनि

होईं सावधान। स्वरूपानुसंधान ठेवीं तूं ॥ ८॥ तूं म्हणसी हें प्रत्यक्ष। मी पाहतों समक्ष। तरी तुज समाधिदक्ष। देईल साक्ष उलटचि ॥ ९॥ जैसा भिकारी जागेपणीं। स्वप्नीं महाराज होवूनी। राज्य करी संपदा भोगुनी। पुनः जागेपणीं भिकारी हा ॥ १०॥ मग तें राज्य आठवून। मी राज्यभ्रष्ट झालों म्हणून। तो करी कीं रोदन। तेवीं जाण संसार हा ॥ ११॥ स्वप्नीं मद्य मांस भक्षिती। चांडाळीशीं रमती। ते प्रायश्चित्त घेती। जागेपणीं कीं ॥ १२॥ कोणी एक आपुला। जागेपणीं मेला। स्वप्नीं तोचि भेटला। हर्ष झाला अपार ॥ १३॥ स्वप्नीं कोणी स्वजन। मेला असें पाहून। रडत रडत जागा होउन। त्या पाहून नच रडे ॥ १४॥ कोणी भुकें निजती। स्वप्नीं पोटभर जेविती। जागे होतां मागुती। तृप्त होती कीं तेणें ॥ १५॥ स्वप्नीं जें दिसें शुभ। जागेपणीं तें हो अशुभ। जागेपणीं जें अशुभ। स्वप्नीं तें शुभ कधीं ही ॥ १६॥ कधीं लग्नसोहळा पाहती। जागेपणीं कीं साच मानिती। स्वप्नीं सर्पव्याघ्र पाहती। उठोनि पळती सत्य तें कीं ॥ १७॥ क्षणमात्र निजती। मास लोटले पाहती। त्या गोष्टी साच होती। जागेपणीं कीं ॥ १८॥ अतिसूक्ष्म नाडींत। हत्ती घोडे दिसती अमित। ते मानील कीं बुद्धिमंत। साच म्हणोनी ॥ १९॥ तेवीं हा प्रपंच। न मानावा साच। जाणावा हा असत्यच। काळत्रयीं ॥ २०॥ जें जें येथें ये घडोन। तें तें सर्व मिथ्या जाण। सर्व व्यापार सोडून। स्वरूपानुसंधान करीं तूं ॥ २१॥ स्वरूपानुसंधान। व्हाया कीजे मनःशोधन। देवगुरूसेवन। सदाचरण अनासक्तें ॥ २२॥ हेंही मिथ्या जसें स्वप्न। असें न मानो तुझें मन। जेवीं कित्येक स्वप्न। सत्य होय जागृतींत ॥ २३॥ स्वप्नीं मंत्र उपदेशिला। तो जागेपणीं सत्य झाला। स्वप्नीं देवें प्रसाद दिधला। जागृतीं झाला तोचि सत्य ॥ २४॥ ऐसे अनुभव हजार।

लोकीं आले साचार। स्वप्नाध्यायीं हा विचार। सारासार केला चा ॥ २५ ॥ वर्षात्तदर्धाच्चरणाच्च मासाद्यामक्रमात्स्वप्नफलं निशायां ॥ सद्यःफलं चोषसि संप्रदिष्टं दिवा वृथा स्याच्छयनात्पुनश्च ॥ १ ॥ हा मी येथें जन्मलों। हा मी अमुक वाढलों। स्त्रीपुत्रसंपत्तियुक्त झालों। मी झालों दैन्यवाणा ॥ २६ ॥ ऐसे शुभाशुभ स्वप्न पहात। नानापरी बोरळत। स्वयें न हो जागृत। देवगुरुप्रसादा विना ॥ २७ ॥ हा जीव असा बोरळतां। कनवाळू श्रुतिमाता। उपदेशी तत्त्वतां। त्याचा अधिकार जाणुनी ॥ २८ ॥ जरी परमार्थीं पराङ्मुख। तया कर्ममार्ग चोख। निष्कामपणें देख। श्रुति सम्यक् बोलतसे ॥ २९ ॥ जरी कर्मीं असोन। चंचळ असें अंतःकरण। तया उपासना सांगून। परमार्थी लावी श्रुति ॥ ३० ॥ जरी नित्यानित्य विचारून। इहभोगा दे सोडून। शमदमादि साधून। मुमुक्षु होऊन तळतळे ॥ ३१॥ तया ज्ञान व्हावें म्हणून। श्रवण आणि मनन। तयांचें निदिध्यासन। श्रुति सांगून बोध करी ॥ ३२ ॥ हें जाणावें शुभ स्वप्न। संसार जाणावा दुःस्वप्न। तेथें क्षणमात्रही मन । सूज्ञजन न धरिती ॥३३॥ तेव्हां तूं जागृत व्हावें म्हणून। संसार हें दुःस्वप्न। दे सर्वथा सोडून। ज्ञान जोडून कृतार्थ हो ॥ ३४ ॥ स्वधर्माचें आचरण। देवपूजा व्रत दान। फलाची इच्छा सोडून। करितां मन शुद्ध होय ॥ ३५ ॥ कायावाचामनें करून। न दुःखवावे प्राणी जन। हिचें नाम अहिंसा जाण। ही आदरून धरावी ॥३६॥ जें पाहिलें ऐकिलें जाण। तेंचि कीजें भाषण। जें यथार्थ कथन। हें सत्य जाण तारक ॥ ३७ ॥ पुढें अथवा माघारीं। कोणाचीही न करी चोरी। हेंचि अस्तेय अव-धारीं। हें अंतरीं आदरावें ॥ ३८ ॥ परिग्रह म्हणजे साठा। तो करी सर्वथा तोटा। तो सांडणें तत्त्वतां। अपरिग्रह म्हणती योगी ॥ ३९ ॥ एका गृहस्थावांचून। कायावाचामनें करून। यावें मैथुन

सोडून। हेंचि जाण ब्रह्मचर्य।। ४० ।। अहिंसा सत्य अस्तेय। अपरिग्रह ब्रह्मचर्य। हें पंचक यम होय। सेविजे निर्मायपणें हें ।।४१।। स्वधर्मानुष्ठान हेंचि तप। स्वाध्याय म्हणजे गुरुमंत्रजप। मानसीं करितां अमूप। फळ तात्काळ मिळतसे।। ४२।। मृज्जलानें बाह्य शौच। ईश्वरध्यानें आंतर शौच। ईश्वरप्रणिधान साच। सर्व करणें ईश्वरार्पण ।। ४३ ।। परिमित निद्रा आहार। हे होत नियम साचार। हे पाळावे सादर। वारंवार अभ्यासानें ।। ४४।। मृदु आसन घालून। समासन ठेवून। एकांतीं बसून। सगुणेश्वरध्यान करावें ।। ४५ ।। हृदयकमळ अधोवदन। तें करावें ऊर्ध्ववदन। सोहंमंत्र उच्चारून। प्रफुल्लीत तें भाविजें ।। ४६ ।। त्यामध्यें विराजमान। रत्न-जडित सिंहासन। त्यावरी सगुणमूर्तीचें ध्यान। कीजे मन स्थिरवून ।। ४७ ।। पायांच्या तळव्यासून। एका एका अंगाचें ध्यान। करावें लक्ष लावून। तें स्थिर होतां पुढें ध्यावें ।। ४८ ।। एवं मस्तकापर्यंत। संपूर्ण मूर्ति चित्तांत। भरून ध्यावी संतत। स्थिरवून चित्त भावानें ।। ४९ ।। दुसऱ्या विषया आठवून। जरी सुटेल तें ध्यान। तरी पुनः मुळापासून। करावें चिंतन सावधानें ।। ५० ।। मुख सुहास्य चिंतून। हास्यमात्रा मनीं ध्यावें भरून। तोच मी परमानंद म्हणून। निश्चित चिंतन करावें ।। ५१ ।। जागृती स्वप्न निद्रा साक्षी। निर्विकारें वृत्ती लक्षी। तीनी देहा जो निरीक्षी। तो मी त्वंपदार्थ लक्ष्यार्थ ।।५२ ।। स्थूलदेह अन्नमय कोश। लिंगदेहीं तीन कोश। प्राणमय मनोमय विज्ञानमय। आनंदमय कारणदेहीं ।।५३।। ह्या पंचकोशांहून। मी वेगळा म्हणून। ह्यांचे धर्म मजला न। काळत्रयीं ।। ५४ ।। हा देह मी नोहे देख। मी नोहे कोणाचा लेक। स्त्री पुरुष नपुंसक। काळ-त्रयीं मी नोहे ।। ५५ ।। मी नोहे कोणाचा संबंधी। नसे मला धर्मा-धर्म उपाधी। न स्पर्शे आधिव्याधि। काळत्रयीं ।। ५६ ।। नसे मला

वर्णाश्रमादि । न शिवे मला शीतोष्णादि । नसे मला जन्ममरणादि । षड्विकाररहित मी ॥ ५७ ॥ नामगोत्र नसे मला । रूपवर्ण नसे मला । मग आकार संस्कार कैंचा आला । सर्व देहाचे विकार ॥५८॥ धन क्षेत्र गृहाराम । नसे मला कुळधर्म । येथें कैंचें आलें शर्म । नाहींच वर्म मजलागीं ॥ ५९ ॥ अन्नमयकोशविकार । हे मला नसती साचार । यांचा द्रष्टा मी यांहूनि पर । निर्विकार निरामय ॥ ६० ॥ नाहीं भूक मला । न शिवे तहान मला । सबल दुर्बल न मी मला । देणें घेणें कांहींच न ॥ ६१ ॥ न मी भैरा आंधळा । न मी नपुंसक पांगळा । हा दोष सगळा । प्राणमयकोशावरी ॥ ६२॥ मी नोहे प्राणमय कोश । त्याचा द्रष्टा निर्दोष । नित्य तृप्त निर्विशेष । समरसेसी ॥६३॥ न शिवे मला वाग्जाल । नाहीं मला संकल्प । नाहीं मला विकल्प । न मी व्याकूल संशयानें ॥ ६४ ॥ सुख दुःख क्षोभ । नाहीं नाहीं शोक भय लोभ । काम क्रोध मद स्तंभ । मोह मद भेद खेद ॥६५॥ हर्ष विषाद मत्सर । न मला हे मनावर । विराजती मी तरी दूर । मनाहूनी ॥ ६६ ॥ मी नोहें सुबुद्ध । मी नोहें दुर्बुद्ध । नोहें ऊहापोहविद्ध । नोहें बुद्ध विशुद्ध मी ॥ ६७ ॥ मी नोहें अवधानी । मी नोहें मानी । मी नोहें अखंडज्ञानी । विज्ञानमयाचा साक्षी मी ॥ ६८ ॥ म्हणोनि कर्तृत्वादिक । नसे मला हें आध्यासिक । विज्ञानाहोनी मी पृथक् । आहे चिदेकरस मी हा ॥ ६९ ॥ मी स्वयंप्रकाशमान । सूर्यासमान भासमान । कैंचें मला अज्ञान । नाहीं आवरण विक्षेप ॥ ७० ॥ प्रिय मोद प्रमोद । माझे ठायीं हा न भेद । म्हणोनि नसे मजला खेद । मी स्वच्छंद स्वतःसिद्ध ॥ ७१ ॥ स्मृति विस्मृति न मला । हे धर्म असती त्याला । आनंदमय म्हणती ज्याला । आनंदविकार जीव मी न ॥ ७२ ॥ अत एव न भोक्तृत्वादिक । मी अद्वितीय एक । पंचकोशाहून पृथक् । परात्पर ॥ ७३ ॥ हा समुदाय ।

दृश्य हाही मी न होय। याचा साक्षी मी तुरीय। स्वसंवेद्य निष्कल ॥ ७४ ॥ जो हा मी त्वंपदलक्ष्यार्थ। तोचि तो तत्पदलक्ष्यार्थ। तो अद्वयानंद अखंडार्थ। प्रत्यगभिन्न परमात्मा ॥ ७५ ॥ मठ उपाधीनें मठाकाश। घट उपाधीनें घटाकाश। दों उपाधींचा नाश। होतां आकाश एक जेवीं ॥ ७६ ॥ जेवीं मायोपाधीनें आत्मा शिव। अविद्योपाधीनें अनात्मा जीव। दोन्ही उपाधी जातां स्वयमेव। परमात्मा परब्रह्म मी ॥ ७७ ॥ अज्ञानोपाधि किंचिज्ज्ञ जीव। मायोपाधि सर्वज्ञ शिव। दों उपाधींचा होतां अभाव। ना जीव ना शिव परमात्मा॥७८॥ मायेनें जो परोक्ष। अज्ञानानें प्रत्यक्ष। अज्ञान माया जातां अपरोक्ष। तो मी अध्यक्ष निर्विकार ॥७९॥ त्या उलट्या वृक्षीं। जीव शिव हे दोन पक्षी। जीव कर्मफळ भक्षी। शिव निरीक्षी साक्षीपणें ॥८०॥ संपलें तें फळभक्षण। आतां राहिलें साक्षीपण। निरसलें साक्ष्य संपूर्ण। ही आहे खूण स्वसंवेद्य ॥८१॥ असें मी सच्चिदानंद। नित्य शुद्ध बुद्ध निर्भेद। नित्यमुक्त परमानंद। अनंत वेदवेद्य मी ॥ ८२ ॥ असें निरंतर चिंतन। करावें स्थिरवूनियां मन। दृढ होतां अनुसंधान सिद्ध होई ॥ ८३ ॥ दुष्टभावना नष्ट होती। ध्यानीं स्थिर होई मती। सहज ये समाधिस्थिती। अभ्यासपद्धती आदरितां ॥ ८४ ॥ अभ्यासकाळातिरिक्त काळीं। बाह्य व्यवहार करते वेळीं। ममाहंतेची होळी। करीत असावें उदासी ॥ ८५ ॥ देह हा कर्माधिष्ठान। अहंकार कर्ता जाण। इंद्रियगण करण। पंचप्राण चेष्टाहेतू ॥ ८६ ॥ श्रोत्रादि देव इंद्रियांच्या। दिगादि देवतांच्या। मेळणीं त्रिविध कर्मांचा। उगम होय ॥ ८७ ॥ कायेनें होतें कायिक। वाचेचें कर्म वाचिक। मनाचें कर्म मानसिक। त्रिविध कर्म हें जाण ॥८८॥ पांच हेतूनीं हीं तीन। कर्में होती अनुदिन। येथें जीव नसून। म्हणे अध्यासून मी कर्ता ॥ ८९ ॥ जें घडे पुण्यपाप। त्याचा अहंकारें घेई लेप।

अंगीं लावूनि मग ताप। ये तो कल्पांतींही न चुके ॥ ९० ॥ जे अहंपणा धरून। कर्मं लिप्त होती जन। त्यां येती फळें तीन। इष्टानिष्ट आणि मिश्र ॥ ९१ ॥ पुण्याचें इष्टफळ। मिळे स्वर्गसुख केवळ। पुण्य संपतां तत्काळ। अधःपात होतसे ॥ ९२ ॥ पापफळ अनिष्ट। नरकवास उत्कट। तिर्यग्योनी महाकष्ट। शीत वातोष्ण उक्तचि ॥९३॥ पापपुण्य समान। मिश्रफळ दे जनन। सुखदुःखमिश्रित जाण। मनुष्यत्व भूलोकीं ॥ ९४ ॥ नरकस्वर्गमोक्षांचे। येथें तीन मार्ग लोकांचे। जे जन सात्त्विक साचे। ते ह्याचें वर्म जाणती ॥ ९५ ॥ कामक्रोधलोभादिक। जे आदरती अविवेक। त्यांना घडे पातक। केवळ नरकवासी ते ॥ ९६ ॥ शास्त्रोक्त न करिती। निषिद्धातें आचरती। त्यांला ये अधोगती। मग मुक्ति कैंची त्यांना ॥ ९७ ॥ फलाभिलाष धरून। जे करती पुण्याचरण। ते स्वर्गी गेले तरी जाण। संसारभ्रमण न चुकेचि ॥ ९८ ॥ म्हणोनि कामादिक त्यजून। ध्यावीं इंद्रियें आवरून। मन करून समाधान। प्रेमें भजावें ईश्वरा ॥ ९९ ॥ सर्वभूतीं तो जाणून। सर्वां द्यावें अभयदान। हेंचि तयाचें पूजन। पुनः जनन नच दे जें ॥ १०० ॥ ईश्वरप्रसादें स्वानुसंधान। लागे तें तोडी भवबंधन। हें मानवजन्माचें सार्थक जाण। तो कृपण हें न करी जो ॥ १०१ ॥

इति श्री० प० प० श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचितं

आत्मानात्मविचारे अभ्यासप्रकरणं संपूर्णम् ॥

---

## ४०८ आत्मानात्मविचार उत्तरभाग.

श्रीगुरु दत्तात्रय गुरूचे गुरू । स्वभक्तांचे कल्पतरू । वंदूनि भवाब्धितारू । वेदान्त निरूपितों स्वरूप ॥ १ ॥ गुरुविण नोहे ज्ञान । ऐसे श्रुतीचें वचन । हें मानूनि निरूपण । करतों गुरुशिष्यसंवादें ॥ २ ॥ शिष्य गुरूसी पुसतसे । ही सृष्टि कोण करितसे । किंवा स्वभावें होतसे । संशय होतसे हा फेडा ॥ ३ ॥ गुरु म्हणे सावधान । एकाग्र करूनियां मन । परिसें कथितों निरूपण । वेदप्रमाण घेवोनी ॥ ४ ॥ श्वासापरी अनायासानें । वेद कथिला ईश्वरानें । त्याला पौरुषेय म्हणणें । न साजे अन्याधारापरी ॥ ५ ॥ संहिता ब्राह्मण अरण । हीं तिन्हीही मिळोन । हा वेद अंगें जाण । शिक्षादिक सहाची ॥ ६ ॥ कर्म उपासना ज्ञान । तीन कांडें वेदांची जाण । स्मृति इतिहास पुराण । वेदाधारें पसरले ॥ ७ ॥ त्या स्वतःप्रमाण वेदाचें । मत हें ऐक तूं साचें । हें ठाणें समाधानाचें । सत्य त्रिवाचे बोलतों ॥ ८ ॥ जी गारा केलेली माती । तिचे पुढें घडे होती । घडथापूर्वी जी माती । मध्यें अंतीं तीच एक ॥ ९ ॥ सृष्टीपूर्वी विश्व हेंच । अद्वितीय ब्रह्म एकच । नामरूप हीं नव्हतींच । जिव्हामन नसल्यामुळें ॥ १० ॥ शिष्या तुझ्या समजुतीस । पूर्वी ह्या काळबोधकास । बोलिलों परी तेव्हां खास । काळ न द्वैतास दावणार ॥ ११ ॥ निर्विकारा न घडे सर्जन । मायेसहिताचें ग्रहण । करितां न ये द्वैतपण । शक्ति जाण अवस्तु माया ॥ १२ ॥ शक्तिशक्तिमंता अभेद । मिथ्या प्रतिबिंबेन भेद । न ये चंद्रा निर्विवाद । मायेनें भेद न तसा ब्रह्मा ॥ १३ ॥ जें उपाधीनें भासे । तें उपाधि नासतां नासे । त्याणें द्वैत येईल कसें । खऱ्या स्वरूपा ॥ १४ ॥ जे अनिर्वचनीय शक्ति । ती वेदांती म्हणती । असे ब्रह्माधीन ती । तेणें अद्वैत येत नसे ॥ १५ ॥ त्या मायाशक्ति युक्त । ब्रह्म हो अव्या-

कृत। हें जगद्बीज अव्यक्त। त्रिगुणात्मक होतसे ॥ १६ ॥ त्यापासून शब्दयुक्त आकाश। त्यापासून वायू सशब्दस्पर्श। त्यापासून अग्नी खास। शब्दस्पर्शरूपगुणें ॥ १७ ॥ सशब्दस्पर्शरूपरस। जल उपजे त्यापासाव खास। सशब्दस्पर्शरूपरस। गंध भूमी ॥ १८ ॥ कारण-गुण कार्यां येती। तैसे मायागुण पंचभूतीं। म्हणूनि त्रिगुणात्मक होती। पंचभूतें तीं मायिक ॥ १९ ॥ प्रत्येकाचे सत्त्वांशेंकरून। श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हा घ्राण। पंच ज्ञानेंद्रियें होतीं जाण। अंतःकरण सत्त्वां-शैक्यानें ॥ २० ॥ निर्विकल्प अंतःकरण। संकल्पात्मक मन। निश्चया-त्मक बुद्धि जाण। अनुसंधानरूपी चित्त ॥ २१ ॥ अहंकार मीपण। हें पंचविध अंतःकरण। प्रत्येक रजांशानें जाण। कर्मेंद्रियें पांचही ॥ २२ ॥ वाचा हस्त पाद। लिंग आणि गुद। रजोंशैक्यें प्राणभेद। पंच तयाचे वृत्तीनें ॥ २३ ॥ यांचे देवता विषय। एक ब्रह्मची स्वयें होय। प्राणेंद्रियांतःकरणसमुदाय। लिंगशरीर सूक्ष्म होय ॥ २४ ॥ पंचभूतांचे दोन दोन भाग। एका एका अर्धांचे चार भाग। करोनि दुसऱ्या अर्धांशीं योग। करितां होय पंचीकरण ॥ २५ ॥ ह्या पंची-कृतापासून उद्भिज्ज। स्वेदजांडज जारज। होती चौदा लोक विराज। सर्व एक मिळोन ॥ २६ ॥ ह्या चारी देहांत। जीवरूपें ब्रह्म रिघत। कर्तत्व भोक्तृत्व पावत। मोक्षापर्यंत द्वैतभावें ॥ २७ ॥ जाग्र-त्स्वप्न सुषुप्ति। दैनंदिन व्यवहार म्हणती। जन्म घेणें हे वेदांती म्हणती जन्मांतरस्वीकार ॥ २८ ॥ हा जीवाचा संसार। ईश्वरसृष्टी-वर। अहंताममतादि व्यवहार। हे प्रातिभासिक जीवसृष्टी ॥ २९ ॥ पारमार्थिक ब्रह्मावर। ईशसृष्टी अनिवार। हा व्यावहारिक संसार। ईश्वराचा ॥ ३० ॥ हें सर्वही द्वैत। निवारीजे होवूनि अद्वैत। तरीच होय सदोदित। सच्चिदानंद निजांगें ॥ ३१ ॥ सर्वाधिष्ठान ब्रह्म जेधवां। विवेकें कळे तेधवां। करोनि द्वैतभावा। होय सच्चिदानंद

निजांगें ॥ ३२ ॥ ब्रह्मचि सर्वाधिष्ठान। तेंच उत्पत्तिस्थितिलयकारण। म्हणोनि एकाचें ज्ञान। होतांचि सर्वज्ञान होतसे ॥ ३३ ॥ अत एव वेदांतमत। सिद्ध करी अद्वैत। तार्किकांचा सिद्धांत। घेतां अद्वैत साधेना ॥ ३४ ॥ प्रकृतिपुरुषविवेक। तत्त्वविचार करितां चोख। मोक्ष होतो हा लेख। सांख्यांचा एकत्व न दावी ॥ ३५ ॥ पुरुष हा उदासीन। प्रकृति जगत्कारण। प्रतिशरीरीं भोक्ता जीव भिन्न। जगत्सत्य जाण हें सांख्यमत ॥ ३६ ॥ स्वयें प्रकृति जड असोन। ती केवीं करील जगदुत्पादन। न चालती चेतनावीण। अचेतन रथादिक ॥ ३७ ॥ तूं म्हणशील स्तनांतून। दूध वाहे अचेतन। जळही जातें स्वयें वाहून। हेही जाण ईश्वरेच्छा ॥ ३८ ॥ तीन गुण समान। हे सांख्यप्रकृति प्रधान। तया नसता प्रेरक चेतन। केवीं गुणविभाग होईल ॥ ३९ ॥ गाईचें पोटीं तृण। दुग्ध होतें तेवीं प्रधान। जगदाकार होऊन। स्वयमेव राहे म्हणसी जरी ॥ ४० ॥ तरी हेंही न घडेल। तृण खाईल बैल। त्याचें दुग्ध कीं होईल। तसें न होईल प्रकृति जगत् ॥४१॥ जसा स्वयें आंधळा। चालवी डोळस पांगुळा। तेवीं पुरुष प्रकृतीला। चालवी म्हणों तरी न घडे ॥ ४२ ॥

---

## ४०९ उपदेश

गुरुमाता सांगतसे, ऐक मुली आतां। आला आज दीपवाळी, सण बरवा मोठा ॥ ध्रु० ॥ लावि अंगि नित्यानित्यवस्तुविवेकाचें ॥ उटणें मग रागमळ, जातिल तव तनुचे ॥ १ ॥ झगझगितचि हें अमूल्य पाडी न जें शोकीं ॥ शांतिवसन तूं नेसून शोभसि या लोकीं ॥ २ ॥ भूतदया आणि क्षमा भूषण लेवून ॥ शोभविं हें आत्मरूप भूषित होवून ॥ ३ ॥ करिं धरिं हें सोज्वल मति सोन्याचें ताट ॥

अंतरिं धरि ज्ञानेंद्रियरत्नदीप थाट ॥ ४ ॥ तीन तनु लिंबलोण उतरुनि त्यजि दूरी ॥ ईश्वर गुरु आत्मबंधु चिंतुनि अंतरी ॥ ५ ॥ घे सोहंभावें ती सोज्वळ आरती ॥ ओवाळीं एक भक्तिभावानें निगुती ॥ ६ ॥ ओवाळणी घे तूं ही दिव्य अमोलीक ॥ कूटस्थ प्रत्यगात्म-साक्षी अवलीक ॥ ७ ॥ रात्रंदिन जातां येतां निजतां ही बसतां ॥ अनुभविं तूं साक्षिपणें संतत त्या आतां ॥ ८ ॥ तो आत्मा सच्चित्सुख तुजहुनि नच भिन्न । तूंहि तयाहुनि कधिंहि नससी हो भिन्न ॥ ९ ॥ गुरुमाता सांगतसे ऐक मुली आतां ॥ आला दिपवाळी सण बरवा मोठा ॥

---

सासुर्वासी बाळी । आलिया दिवाळी । गुरुमाते जवळी । आली त्रस्त ॥ १ ॥ हंबर्डा फोडोनी । मायेपुढें रडे । म्हणे दुःखीं पडे । सासुर्वासीं ॥ २ ॥ सासू दुष्टबुद्धि । मोह तो सासरा । यांही मज थारा नाहीं दिल्हा ॥ ३ ॥ तामसाहंकार । रागीट भ्रतार । त्या करवि मार । देती नित्य ॥ ४ ॥ कामादिक दीर । चावटचि क्रूर । यांही दिल्हा मार । पदोपदीं ॥ ५ ॥ कल्पना जावू हे । बोटचे मोडताहे । तृष्णा नणंदूली हे टवळी द्वाड ॥ ६ ॥ लावालावी करून । सर्वही गांजीती । मज नच देती । शांतीवस्त्र ॥ ७ ॥ मारुनि तितिक्षा । बांगड्या वाढवीती । ग्रासही न देती । स्वानंदाचा ॥ ८ ॥ श्रद्धाभक्ति-शेजे-। कडे दृष्टि देतां । धरुनिया हाता । ओढिती हे ॥ ९ ॥ करकर दांत । खाती माझेवर । तूंही समाचार । नच घेसी ॥ १० ॥ मेल्यें किंवा आहें । हेंही तुझ्या मनीं । आलें न म्हणूनी । हो व्याकूळ ॥ ११ ॥ आतां तुझे पायीं । जीव देतें ठार । पुरे येरझार । या जन्माची ॥ १२ ॥

---

गुरुमायी म्हणे बाळे । आतां शांत हो ये वेळीं ॥ १ ॥
तुज आठवि वेळोवेळ । म्हणोनि म्यां धाडिलें मूळ ॥ २ ॥
तुझा बंधू हा विवेक । धाडिला म्यां आजी ऐक ॥ ३ ॥
शांति साडी दे नेसून । घे तितिक्षा बांगड्या भरून ॥ ४ ॥
कंठीं बांधू साधन यंत्र । तेणें होसी तूं स्वतंत्र ॥ ५ ॥
आतां सासु होईल सुबुद्धि । न च देईल ती आधी ॥ ६ ॥
सात्त्विक अहंकार । अनुकूल होईल भ्रतार ॥ ७ ॥
येरा गाढवांची भीड । तुज कायसी सर्वां सोड ॥ ८ ॥
श्रवणादी पोटभर । खायिं देयीं तृप्ति ढेकर ॥ ९ ॥
प्रसवूनी बोधपुत्रा । नांद सुखें उद्धरिं गोत्रा ॥ १० ॥
शिरावर गुरुचा कर । येता कैची येरझार ॥ ११ ॥
वासुदेवगुरुचा बोल । कालत्रयीं नोहे फोल ॥ १२ ॥

---

## ४१० ब्रह्मचिंतन

जें वासुदेवाख्य अव्यय । तें परब्रह्म मीच होय । ऐसा जयाचा निश्चय । तो मुक्त होय अन्य बद्ध ॥ १ ॥ मीच परब्रह्म असे । ब्रह्माहून वेगळा नसे । ब्राह्मणें कीजे उपासन असें । ब्रह्मभाव धरून ॥ २ ॥ मीच परब्रह्म निश्चीत । अबाध्य असंग चिद्रूप निश्चित । प्रयत्नानें असें चिंतीत । राहतां मुक्त होतसे ॥ ३ ॥ जें सर्वोपाधिशून्य । जें निरंतर चैतन्य । तें मी ब्रह्म न अन्य । वर्णाश्रम मग कैचे ॥ ४ ॥ मी ब्रह्म असें जाणतां । तया ये सर्वात्मता । तन्मुक्तीला आड देवता । न येती आत्मा त्यांचाही होतो ॥ ५ ॥ माझ्याहून देव भिन्न । असें करितां उपासन । तया न होय ब्रह्मज्ञान । पशुसमान हो तो देवा ॥ ६ ॥ मी आत्मा नच अन्य । ब्रह्मच मी शोकशून्य । सच्चिदानंद

मी धन्य। नित्यमुक्तस्वभाव मी।। ७।। असें आपणा ब्रह्म मानून। सतत वागे तया न। दुष्कृत आणि दुष्कृतापासून। आपत्ती जाण न होती ॥ ८ ॥ आपणा ब्रह्म मानून। रहावें सुखें करून। मी ब्रह्म आहें असें चिंतन। हो कां क्षणभर ही बरा ॥ ९ ॥ तें महापातका निवारी। जेवीं अंधकारारी। सर्वांधकारा निवारी। म्हणोनि ब्रह्म-चिंतन करावें ॥१०॥ अज्ञानामुळें ब्रह्मापासून। आकाश झालें बुद्बुदा समान। वायू झाला आकाशापासून। वायूपासून तेज झालें ॥११॥ उदक झालें तेजापासून। पृथ्वी झाली उदकापासुन। व्रीहियवादिक पृथ्वीपासून। झाले उत्पन्न अज्ञानामुळें ॥१२॥ पृथ्वी विरतां उदकांत। उदक विरे तेजांत। तेज विरे वायूंत। वायु आकाशांत विरतसे ॥१३॥ आकाश विरे अव्याकृत मायेंत। तें विरें शुद्ध ब्रह्मांत। त्याहूनि अन्य न उरत। तें ब्रह्म मी हरी विष्णु ॥१४॥ यन्मायेनें कर्तृत्व भोक्तृत्वादिक। तो अच्युत अनंत गोविंद मी एक। तोच मी हरी आनंदरूपक। अज अमृत अशेष मी ।। १५ ।। नित्य निर्विकल्प निर्विकार। सच्चिदानंद अव्यय मी पर। पंचकोशातीत परमेश्वर। अकर्ता अभोक्ता असंग मी ॥ १६ ॥ लोहचुंबकापरी माझे जवळ। इंद्रियादिकांचा होतो खेळ। मी आदिमध्यांतीं मुक्त केवळ। स्वभावशुद्ध मी बद्ध नसे ॥ १७ ॥ मी ब्रह्मचि न संसारी। मी मुक्त हें चिंतिजे अंतरीं। हें चिंतन न घडे तरी। वाक्य उच्चारी जें हें नित्य ॥ १८ ॥ या अभ्यासानें भ्रमर-कीटवत्। ब्रह्मभाव होय निश्चित। संशय सोडूनी सतत। करावा निश्चित अभ्यास ॥ १९ ॥ हें ध्यान करितां एक मास। ब्रह्महत्येचा-ही होतो नाश। एक वर्ष करितां हा अभ्यास। मिळती खास अष्ट-सिद्धि ॥ २० ॥ यावज्जीव अभ्यास करितां। आंगीं बाणे जीवन्मु-क्तता। मी देह न प्राणेंद्रियें तत्वतां। ही दृढता होय तयाची ॥ २१ ॥ मी न मन न बुद्धि न चित्त। मी न अहंकार न भूमी न पय। मी न

तेज न मी वात । मी न आकाश सर्वथा ॥ २२ ॥ मी न शब्द न स्पर्श न रस । मी न गंध न रूप खास । मी नोहे हा मायाविलास । मग संसारभास मज कैचा ॥ २३ ॥ साक्षिस्वरूपें केवळ । मी शिवची निर्मळ । मिथ्या जगज्जाल । होउनी मृगजळवत् राहे ॥२४॥ ज्ञानें माझे ठायींच तें विरे । मग एकची ब्रह्म मी उरें । शेवीं अनंत मीच न दुसरें । तोच मी सर्वेश सर्वशक्ति ॥ २५ ॥ मी आनंद सत्य बोध पुरातन । ऐसें असें हें ब्रह्मचिंतन । हा प्रपंच मिथ्या म्हणून । सत्याद्वय ब्रह्म मीचि एक ॥ २६ ॥ याविषयीं वेदांत प्रमाण । गुरु स्वानुभव तिसरा जाण । मी ब्रह्म न संसारी ब्रह्मभिन्न । मी न देह सनातन केवळ मी ॥ २७ ॥ एकची अद्वय ब्रह्म । येथें नसे नाना भ्रम । हें कळावया ब्रह्मचिंतनक्रम । कथिला भ्रम निरसावया ॥ २८ ॥

इति श्री० प० प० श्रीवासुदेवानंदसरस्वतीविरचितं
ब्रह्मचिंतनं संपूर्णम् ॥

---

## ४११ अभंग ऐतरेयभावार्थरूप

(१)

देवाचा जो देव भासे स्वयमेव । जाणे भावाभाव भावाचा जो ॥ १ ॥
पूर्णानंद एक रची नाना लोक । सर्वांचा पालक एकदृष्टी ॥ २ ॥
ज्याचें कर्म जैसें त्या दे फळ तैसें । ज्या वैषम्य नसे कारुणिका ॥ ३ ॥
लालन ताडन बाळाचें करितां । निंद्य नोहे माता तेविं हाही ॥ ४ ॥
उदासीनापरी करोनी अकर्ता । चिंति तया दत्ता वासुदेव ॥ ५ ॥

(२)

ऐक्यावधारण द्वैतनिवारण । श्रुति करी जाण जेथ तो हा ॥ १ ॥
जग हें सृष्टी पूर्वी तोचि अद्वितीय । एक अप्रमेय हो सदैव ॥ २ ॥

होता संत हीन पुनरुक्ति हीन । लोकींही भाषण आहे ऐसें ॥ ३ ॥
जिह्वा मन नसतां नामरूपवार्ता । तेव्हां नसे कथा कालाचीही ॥४॥
लोका सांगावया पूर्वकाल गणे । श्रुति असें म्हणे वासुदेव ॥ ५ ॥

( ३ )

आत्मा हो निमित्त माया उपादान । म्हणती ही ये न द्वैतवाद ॥१॥
माया अवास्तवी शक्ति आत्म्याची हे । आत्मदृष्टीनें हे रची विश्व ॥२॥
कूटस्थरूपा जी न येतां विकार । रची चराचर मायावीसी ॥ ३ ॥
अनिर्वाच्य माया घेतां ही श्रुतीस । अखंडैकरस बोलूं आला ॥ ४ ॥
सामानाधिकरण्य आत्मजगतार्चे । बोधार्थ सांभाचे जेविं चोर ॥ ५ ॥

( ४ )

अध्यारोपापवादानें । तत्त्व कथिलें वेदानें ॥ १ ॥
अध्यारोप सृष्ट्यादिक । अपवाद तत्त्वं एक ॥ २ ॥
वासुदेव एकरूप । व्हाया सांगे अध्यारोप ॥ ३ ॥

( ५ )

ज्ञानरूपी तप आत्म्याचें । तो म्हणे मी विश्व रचे ॥ १ ॥
चौदा लोक उपजवी । लोकपालांही उद्भवी ॥ २ ॥
येथ गुणोपसंहार– । न्यायें भूतसृष्ट्यादर ॥ ३ ॥
मुख्य आत्मा उपसंहारे । ध्यावा अन्य न चतुरें ॥ ४ ॥
सृष्टी करी आत्मदेव । देवांचीही सांगे देव ॥ ५ ॥

( ६ )

जलमुख्य भूतां घेवोनी परेशा । रचूनि पुरुष तया पाहे ॥ १ ॥
अंडवत मुख फुटोनी हो वाचा । जन्म हो अग्नीचा तीपासून ॥ २ ॥
नासा उपजली प्राण तीपासून । वायू त्यापासून उत्पन्न हो ॥ ३ ॥
झालीं अक्षिछिद्रें चक्षु त्यापासून । सूर्य त्यापासून उत्पन्न हो ॥ ४ ॥
उपजे कर्ण श्रोत्र त्यापासून । होती त्यापासून दाही दीशा ॥ ५ ॥

(७)

त्वचा उपजली तीपासून रोम । त्यापासोनि जन्म ओषधींचा ॥१॥
हृदय उपजलें त्यापासोनि मन । चंद्रा ये जनन त्यापासून ॥ २ ॥
नाभी उपजली तेथें हो अपान । मृत्यु त्यापासून उत्पन्न हो ॥ ३ ॥
शिश्न झालें तेथ उपजलें रेत । आप उपजत त्यापासून ॥ ४ ॥

(८)

विराटाच्या पोटीं देवता पडती । क्षुधातृषा मोठी व्यापी तयां ॥ १ ॥
त्या म्हणती ईशा आम्हां दे शरीर । तेथ अन्नाहार पुरवूं आम्ही ॥२॥
गजाश्वादि देह देयि तयां देव । परि त्यांचा भाव तृप्त नोहे ॥ ३ ॥
शेवटीं नृदेह देतां तृप्त होती । देवता वदती बरें झालें ॥ ४ ॥

(९)

आत्मा म्हणे त्या अमरां । आपुलालीं स्थानें धरा ॥ १ ॥
मग अग्नि वाचा होयी । मुखीं प्रवेशुनी राही ॥ २ ॥
वायु होवोनियां प्राण । धरी नासारंध्रस्थान ॥ ३ ॥
रवि चक्षु होवोनियां । रिघे नेत्रीं पाहावया ॥ ॥ ४ ॥
श्रोत्र होवोनियां दिशा । कर्णीं रिघति ज्या श्रवणाशा ॥ ५ ॥

(१०)

ओषधी रोम होवून । धरिती त्या त्वचास्थान ॥ १ ॥
चंद्र होवोनियां मन । धरि तेव्हां हृदयस्थान ॥ २ ॥
मृत्यु होवोनी अपान । स्वीकारी तो नाभिस्थान ॥ ३ ॥
आपोदेव रेत होवोन । धरि त्या शिश्नस्थान ॥ ४ ॥

(११)

क्षुधातृषा आत्मयातें । म्हणती दे स्थान आम्हांतें ॥ १ ॥
स्थान नसे म्हणुनी त्यांतें । देवां पोटीं दे स्थानातें ॥ २ ॥

जे जे देव भाग घेती । त्यांही दोघी तृप्त होती ॥ ३ ॥

( १२ )

लोक लोकपाल होतां । करी आत्मा अन्नचिन्ता ॥ १ ॥
जलमुख्य भूतें घेऊन । निर्मी जराचर अन्न ॥ २ ॥
वागादिके भोक्तृवर्ग । अन्न भक्षूं इच्छी सवेग ॥ ३ ॥
परी नोहे अन्नाहार । मग अपानें करी आहार ॥ ४ ॥
आयुर्हेतु अन्नद्वारा । अन्नग्राह करावया ॥ ५ ॥

( १३ )

आत्मा म्हणे वागादिक । कामें करिती मत्सेवक ॥ १ ॥
हे स्वतंत्र होतां जाण । मग कोण मी होईन ॥ २ ॥
आप आपणा ओळखाया । देहीं जाऊं कोठोनीयां ॥ ३ ॥
ऐसा विचार करित । शिर भेदुनि जायी आंत ॥ ४ ॥
जे जाती करुनी भेद । ह्या द्वारा त्यां हो आनंद ॥ ५ ॥

( १· )

क्रियोपाधिक जो प्राण तो प्रवेशे । पायांतून असें वदे वेद ॥ १ ॥
गळ्याखालीं कर्मेंद्रियांचें बाहुल्य । धींद्रियबहुत्व कंठावरी ॥ २ ॥
वरूनी प्रवेश ज्ञानोपाधिकाचा । हो ज्ञानेंद्रियाचें वरि बाहुल्य ॥ ३ ॥

( ‌१५ )

पुरीं राव येतां पुरपौरा शोभा । तसी देहीं शोभा आत्मयोगें ॥१॥
वाडा करोनिया तीन मजल्यांचा । खेळ आत्मयाचा व्यवस्थेनें ॥२॥
नेत्रीं चित्तीं कंठीं जागृत् निद्रा स्वप्न । तिघांसही स्वप्न म्हणे वेद॥३॥
अन्यथा ग्रहण तेंचि होय स्वप्न । हें असें लक्षण जागृत स्वापा ॥ ४ ॥
दैनंदीन क्रीडा येथें तीन देहीं । मातृपितृस्वदेहीं जन्मांतर ॥ ५ ॥

(१६)

अशीं लाखो जन्में होतीं। परी जीवा न ये मुक्ति ॥ १ ॥
जेव्हां सत्संग आदरी। प्रेमें दत्तभक्ति करी ॥ २ ॥
तेव्हां साधनें जोडून। गुरुवाक्या घे उमजून ॥ ३ ॥
मीच भूत भौतिकही। मज वाचुनि कांहीं नाहीं ॥ ४ ॥

(१७)

तो प्रविष्ट मी मज पाहें। व्यापकत्वें मुक्त राहें ॥ १ ॥
होयी इंद्र त्याचें नाम। परि तया इंद्र नाम ॥ २ ॥
इंद्रनाम हो परोक्ष। देवा आवडे परोक्ष ॥ ३ ॥
अपवाद हा विचार। वासुदेवा साक्षात्कार ॥ ४ ॥

(१८)

अध्यारोपीं देहत्रयप्रवेश न। वैराग्य कारण तेंचि होय ॥ १ ॥
अशुचि गंधानें न विटे जो चित्तीं। तया न विरक्ती तीनी लोकीं ॥२॥
मु ताचें आधण विष्ठेचा दांथर। उकडे तयावरती जीव ॥ ३ ॥
अ शुद्ध विटाळीं जठराग्नि पोळे। तयाचें सोवळें कायसें हो ॥ ४ ॥
वासुदेव म्हणे वीट आणि कष्ट। सांगे वेद स्पष्ट वैराग्यार्थ ॥ ५ ॥

(१९)

स्वर्गनरकादिक्रमें ओषधिस्थ। पुरुषदेहीं रेत होत जीव ॥ १ ॥
पुरुषाच्या देहीं पूर्वी तीन मास। करी जीव वास देही व्हाया ॥२॥
सप्तधातु तापें कढोनी हो रेत। हाचि गर्भ ख्यात तातदेहीं ॥ ३ ॥
सर्वांगें करून पोशिलें जें रेत। चित्तीं तें कढत कामाग्नीनें ॥ ४ ॥
योनीमध्यें सोडी ऋतुकाळीं स्त्रीच्या। जन्म हो जीवाचा पहिला हा ॥ ५ ॥

(२०)

अस्थि स्नायु मज्जा होय तातरेत। त्वचा मांस रक्त स्त्रीरक्ताचे ॥१॥

रक्ताधिक्यें नारी रेताधिक्यें नर । होयी षंढाकार साम्य होतां ॥२॥
वायु फोडी शुक्र तेव्हां होय मेळ । स्वकर्म केवळ जन्मा हेतु ॥ ३ ॥
जैसें पूर्वकर्म तैसा पिंड होयी । सुख दुःख घेयी ईशाज्ञेनें ॥ ४ ॥

( २१ )

न पीडे मातेसी रिघोनि उदरीं । स्तनादिकापरी हो मातेसी ॥ १ ॥
भर्तृरूपगर्भा माता परिपाळी । म्हणोनियां पाळी तिला भर्ता ॥ २ ॥
डोहाळे जे होती पति पुरवी ते । न देतां इष्टातें गर्भहानी ॥ ३ ॥
रूपांतर तेंचि आपुलें जाणून । पिता पुंसवनादीक करी ॥ ४ ॥
रूपांतरें भर्ता जन्मे जाया पोटीं । जाया हो शेवटीं भर्तृमाता ॥ ५ ॥

( २२ )

( उपजतां करी जातकर्मादिक । वाढावया लोकपरंपरा ॥ १ ॥
दुसरा हो जन्म उपजतां बाळ । नेणें पुढें काळगती मोहें ॥ २ ॥
गर्भी पीडिता जो प्राणी मुक्त व्हाया । तया दत्तराया विसरे जीव ॥)
॥ ३ ॥

( २३ )

पुण्य कर्म व्हाया पिता योजी तया । कृतकृत्य काया स्वयें
सोडी ॥ १ ॥
जन्मे पुढें तेंचि तिसरें हो जन्म । ऐसें कर्म जन्म अज्ञा मार्गे ॥ २ ॥
ज्ञाना प्रतिबंध येतांही ये जन्म । वामदेवा जन्म जेवीं आलें ॥ ३ ॥

( २४ )

अग्न्यादि देवांच्या योगें जन्में झालीं । म्हणे मी जाणिलीं
वामदेव ॥ १ ॥
लोहापरी देह शेकडोही मातें । राखिती चोरांते जें पायीक ॥ २ ॥
जेवीं श्येन जाळें तोडोनियां पळे । तेवीं ज्ञानबळें तोडी जन्में ॥ ३ ॥

(२५)

ऐसा पूर्व ज्ञानानुभव घेवोनी। वामदेव मुनी गर्भी बोले ॥ १ ॥
देहभेदा तोडी आत्मरूपा जोडी। सर्वानंदगोडी घे हो मुक्त ॥ २ ॥

(२६)

होतां हे विरक्ती। विचार करीती। भजावा म्हणती। कोण हा आत्मा ॥ १ ॥
एक देहीं रिघे एक हें अवघें। ऐसे होत दोघे आत्मे येथ ॥ २ ॥
यांपैकीं कोणाची कीजे उपासना। जो जन्ममरणा शीघ्र वारी ॥ ३ ॥
ऐशा विचारानें तया होय बोध। भेद जो विविध त्या बाधिती ॥४॥

(२७)

जीव जेणें रूपा पाहे। जेणें शब्द ऐकताहे ॥ १ ॥
जेणें गंधा हुंगे जीव। जेणें बोले शब्द सर्व ॥ २ ॥
कडू गोड जेणें जाणें। मनबुद्ध्यादिकें शीणें ॥ ३ ॥

(२८)

हेंचि सर्व हो प्रज्ञान। त्वंपदार्थलक्ष्य जाण ॥ १ ॥
इंद्रादीक देव पंचभूतें जीव। प्रज्ञाना पासाव उद्भवती ॥ २ ॥
प्रज्ञा पाळी सर्वां शेखीं त्यां संहारी। मायावीचे परी वेगळी स्वयें॥३॥
तेंचि ब्रह्म होय तत्पदलक्ष्यार्थ। दों पदांचा होय लक्ष्यार्थ हा ॥ ४ ॥

(२९)

आहे सामानाधिकरण्य। दोनी पदांचें ह्या जाण ॥ १ ॥
अन्योन्यभेदवारण। हो विशेष्य विशेषण ॥ २ ॥
जीव तोचि हो प्रज्ञान। तेंचि एक ब्रह्म जाण ॥ ३ ॥

(३०)

ऐसें हें श्रवण याचेंचि मनन। कीजे मग ध्यान निरंतर ॥ १ ॥

देहात्मज्ञानाचे परि आत्मज्ञान। होतां न बंधन मागुती हो ॥ २ ॥
शमादिकयुक्त ध्याती जे हें खास। अखंडैकरस लाभे तयां ॥ ३ ॥

( ३१ )

यावद्देहपात प्रारब्ध भोगीत। तया जीवन्मुक्ती अलिप्तत्वें ॥ १ ॥
न घटे न वाढे पाप पुण्य होतां। महिमा तत्त्वतां ज्ञानीयाचा ॥२॥
प्रज्ञात्वा होवोनी ह्या देहा सोडोनी। ब्रह्मीं ते मिळोनी जाती
मुक्त ॥ ३ ॥

( ३२ )

ते हृदयग्रंथी तत्काळ तोडीती। संसारा या छेदिती ज्ञानबळें ॥ १ ॥
सर्व पाश त्यांचे तत्काळ तूटती। कर्में क्षया जाती सर्व त्यांचीं ॥२॥
कोठें देह पडो तयां नको काळ। त्यांचें ज्ञानबळ लोकां तारी ॥ ३ ॥
वासुदेव म्हणे इतरासुताचें। मत मी हें साचें वाचें बोले ॥ ४ ॥
वासुदेव म्हणे वामदेवापरी। जो विचार करी तो हो मुक्त ॥ ५ ॥

---

## ४१२ मलप्रभेची आरती[1]

जय जय भगवति गंगे जनिमृतिभयभंगे ॥ मलापहारिणि तारिणि उद्धरिं मज वेगें ॥ ध्रु० ॥ भवदवतापें तापुनि व्यापुनि कलुषानें । तूझ्या तीरीं आलों झालों खिन्न मनें ॥ आतां सत्वरि उद्धरिं अंतरि मन्नमनें ॥ प्रसन्न होउनी शमने दूरीकृतशमने ॥ १ ॥ उपटुनि समूळ पापा तापा शमऊनी ॥ अंतःकरणा शोधुनि लाउनि हरि भजनीं ॥ जननीपरि तूं निशिदिनिं सांभाळुनि सदनीं ॥ कैवल्याच्या ठेवीं मजला भवशमनि ॥ २ ॥ शतयोजनि जो दूरचि राहुनियां गंगा ॥ गंगा ऐसें बोले त्याला जी सुभगा ॥ तत्क्षणि तारी वीक्षणिं येतां जी गंगा ॥ शिवसायुज्या ने ती उद्धरि अघभंगा ॥ ३ ॥

---

## ४१३ भजन

पावनी गंगा । सुभगा । पावनी गंगा ॥ ध्रु० ॥
स्मरतां तत्क्षणि करि अघभंगा । तारी जी भवरोगा ॥ १ ॥
शमवी यज्जल षड्रिपुवेगा । ती हे अमृततरंगा ॥ २ ॥

---

१ ही आरती व भजन मिळण्यास उशीर झाल्यानें शेवटीं छापलें आहे.